

नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत मराठी अभ्यास परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या भाषा आणि जीवन ह्या नियतकालिकाच्या (त्रैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून मराठी अभ्यास परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

वर्ष ३६ । अंक २ । उन्हाळा २०१८
विद्वत्प्रमाणित त्रैमासिक (Refereed Journal)

# भाषा आणि जीवन

जेथे अंतर पाहून आलो

जेथे अंतर पाहून आलो
जिथली होती ते गाव,
फार फार दूर राहिले
जायचे होते ते गाव,
कुणास ठाऊक कोठे आहे?
त्याच्या खुणाही दिसत नाहीत.

थांबून मागे पाहणार नाही.
[illegible] काही पाहिले आहेत,
[illegible] अंधार [illegible] आहे

मी आकाश पाहणार आहे
पुढची येईल ते [illegible] गाणार आहे
शब्द सुचेनासा झाला तर.
तुमची शीळ भरीन

पुसटलेल्या वाटा ओळखू येत नाहीत
पण.
माझा मार्ग चुकलेला नाही
मी आकाश पाहणार आहे
पुढची येईल ते गाणार आहे

[illegible]
५ [illegible]






मराठी अभ्यास परिषद पत्रिका **भाषा आणि जीवन**

संपादक: प्र०ना० परांजपे, H-1 क्लॅरियन पार्क, पुणे 411 067. चलभाष: 94225 09638.
ई-पत्ता: pranaparanjpe@gmail.com. संपादन-समिती: विजय पाध्ये, आनन्द काटीकर, विजया चौधरी, सरोजा भाटे, सलील वाघ.

मराठी अभ्यास परिषद पत्रिका 'भाषा आणि जीवन' हे त्रैमासिक मालक, मराठी अभ्यास परिषद ह्यांच्यासाठी, मुद्रक व प्रकाशक आनन्द काटीकर ह्यांनी विनायक एन्टरप्रायजेस, 517 कसबा पेठ, पुणे 411 011 येथे छापून B-5/16 सनसिटी, सिंहगड रस्ता, आनंदनगर, पुणे 411 051 येथे प्रसिद्ध केले.

| **वार्षिक वर्गणी** | **एक वर्ष** | **तीन वर्षे** | **पाच वर्षे** |
|---|---|---|---|
| व्यक्तींसाठी | ₹ १५०/- | ₹ ४००/- | ₹ ७००/- |
| संस्थांसाठी | ₹ २००/- | ₹ ५५०/- | ₹ ९००/- |

सुट्या अंकाची किंमत ₹ ४०/-. कोणत्याही अंकापासून वर्गणीदार होता येते.

मराठी अभ्यास परिषदेचे आजीव सदस्यत्व (फक्त व्यक्तींसाठी) शुल्क ₹ २०००/- + नोंदणी शुल्क ₹ १००/-.आजीव सदस्यांना पत्रिकेचा अंक पाठवला जातो.

वर्गणी प्रत्यक्ष, रोखीने, थेट (ऑनलाईन/NEFTद्वारे) भरणा करून (बँक ऑफ महाराष्ट्र, टिळक रस्ता शाखा, पुणे; बचत खाते क्र० 20057164260; IFS Code MAHB0000041) देता येईल. धनादेशाने द्यायची असल्यास धनादेश 'मराठी अभ्यास परिषद' ह्या नावाने काढावा. पुण्याबाहेरील कोणत्याही बँकेचा वा शाखेचा असल्यास व 'अॅट पार' वटणारा नसल्यास वटणावळ म्हणून धनादेशाच्या रकमेत ₹ ५०/- भर घालावी. वर्गणीदारांनी कोणत्याही प्रकारे रकमेचा भरणा करताच परिषदेस पत्राने किंवा ई-पत्राने, किंवा 94216 10704 वा 99236 71820 ह्या चलभाष क्रमांकावर लघुसंदेश पाठवून आपले नाव, पत्ता, रक्कम, वर्गणी कोणत्या अंकापासून/वर्षापासून घ्यावी ते कार्यवाहीच्या प्रक्रियेसाठी कळविणे आवश्यक आहे.

जाहिरातींचे दर: पूर्ण पान ₹ २,५००/-, अर्धे पान ₹ १,५००/-, पाव पान ₹ ८००/-, शुभेच्छा ₹ ४००/-, आवरण पृष्ठ तीन ₹ ३०००/-.

प्रकाशन: त्रैमासिक: जानेवारी (हिवाळा), एप्रिल (उन्हाळा), जुलै (पावसाळा), ऑक्टोबर (दिवाळी).



ह्या अंकाची किंमत ₹ ४०/-

## अनुक्रमणिका



**विशेष निवेदन**

गेली दोन वर्षे टपालपत्ता बदलल्यामुळे आणि काही व्यवस्थापकीय अडचणींमुळे, मराठी अभ्यास परिषद पत्रिका 'भाषा आणि जीवन'चे अंक नियमितपणे निघू शकले नाही. ह्याबद्दल क्षमस्व.

आगामी काळात आम्ही हे सारे अंक (कदाचित नेहमीपेक्षा कमी पानांचे) लागोपाठ प्रकाशित करण्याचा प्रयत्न करत आहोत. समृद्ध परंपरा असणाऱ्या आपल्या नियतकालिकाच्या नियमिततेत खंड पडणे योग्य नाही, ह्याची आम्हांला जाणीव आहे. २०१९ ह्या वर्षाच्या अखेरपर्यंत नियमानुसार सर्व अंक प्रकाशित होतील, असे प्रयत्न आम्ही करत आहोत. 'भाषा आणि जीवन'वरील आपला लोभ कायम ठेवावा ही सर्व वाचक, अभ्यासक आणि वर्गणीदार ह्यांना विनंती.

कार्यकारी मंडळ, मराठी अभ्यास परिषद

## पत्रिकेबद्दल वार्षिक निवेदन

मराठी अभ्यास परिषद पत्रिका 'भाषा आणि जीवन' ह्या नियतकालिकाची मालकी व इतर बाबी ह्यांच्यासंबंधी वृत्तपत्रे आणि पुस्तकनोंदणी अधिनियम, कलम डी-१९(बी) आणि वृत्तपत्रे नोंदणी (केंद्रीय) नियमावली १९५६, नियम ८, नमुना ४ ह्यांना अनुसरून केलेले निवेदन :

१. प्रकाशन स्थळ : पुणे, महाराष्ट्र
२. प्रकाशनाची कालनियतता : त्रैमासिक : हिवाळा (जानेवारी), उन्हाळा (एप्रिल), पावसाळा (जुलै), दिवाळी (ऑक्टोबर)
३. प्रकाशक आणि मुद्रकाचे नाव, पत्ता : आनन्द काटीकर, बी-५/१६, सनसिटी, सिंहगड रस्ता, आनंदनगर, पुणे ४११ ०५१
४. राष्ट्रीयत्व : भारतीय
५. मुद्रणस्थळ : विनायक एन्टरप्रायजेस, ५१७ कसबा पेठ, पुणे ४११ ०११
६. संपादकाचे नाव, पत्ता : प्रा० प्र०ना० परांजपे, एच-१, क्लॅरियन पार्क, औंध, पुणे ४११ ०६७
७. राष्ट्रीयत्व : भारतीय

मी आनन्द काटीकर, असे प्रतिज्ञापूर्वक सांगतो की, वर दिलेला तपशील माझ्या माहिती आणि समजुतीप्रमाणे खरा आहे.

- आनन्द काटीकर, कार्यवाह, मराठी अभ्यास परिषद

## संगणकाचे मराठीकरण

आनन्द काटीकर

आज अनेक कामे संगणकाच्या आधारे केली जात आहेत. संगणकाचा दैनंदिन आणि घरगुती वापर जसजसा वाढतो आहे, तसतसा त्यावर होणारा खर्चही वाढतो आहे. या खर्चातही विशिष्ट कंपन्यांच्या आज्ञावल्याच खरेदी कराव्या लागणे आणि तरीही आपल्याला हवे तसे काम न करता येणे आणि मुख्य म्हणजे त्यात मराठीत काम करण्यासाठी अडचणी उभ्या ठाकणे अशा समस्या भेडसावताना दिसतात.

या समस्येचा मुळापासून विचार केला तर काही गोष्टी समोर येतात. एक म्हणजे संगणक चालण्यासाठी किमान आवश्यक गरजा या इंग्रजी भाषेतच पूर्ण होतात, असे सर्वांना किंवा बऱ्याच जणांना वाटते. दुसरी गोष्ट म्हणजे आपल्या गरजा पूर्ण करणाऱ्या अनेक – खरेतर सर्वच आज्ञावली या भारताबाहेरील आस्थापनांनी तयार केल्या आहेत, त्यामुळे त्यात भारतीयांच्या गरजेचा आणि भाषेचाही विचार केला गेला नाही. त्यामुळे आपण भारतीय केवळ ग्राहक म्हणूनच या क्षेत्रात वावरतो आहोत आणि ग्राहक याच श्रेणीत स्वत:ला राखण्यात समाधान मानतो आहोत, हे दुर्दैव!

संगणकाला ना इंग्रजी कळते ना मराठी. त्याला कळतात ते फक्त ० आणि १ हे अंक. हे लक्षात आले की वरच्या परिच्छेदातील पहिल्या मुद्द्याचा निकाल लगेचच लावता येईल. दुसरा मुद्दा मात्र आपल्या मानसिकतेचा आहे. आपल्याला आपल्या भाषेत संगणकीय किंवा तंत्रज्ञानाशी संबंधित व्यवहार करावासा वाटतो का? त्यासाठी थोडे कष्ट करण्याची आपली तयारी आहे का? याची उत्तरे 'हो' अशी असतील तर अनेक आज्ञावली आपण आपल्या सोयीनुसार तयार करू शकतो आणि त्यांचा आपल्या भाषेत वापरही करू शकतो. त्यासाठी जगात सर्वत्र वेगाने वाढणाऱ्या मुक्त आणि व्यक्त आज्ञावली (Free and open source softwares- FOSS) चळवळीचा उपयोग आपण करून घ्यायला हवा.

### मुक्त आणि व्यक्त आज्ञावली म्हणजे काय?

एखादी आज्ञावली कशा पद्धतीने तयार केली जाते, त्यामागे नेमके कोणते सिद्धान्त वापरलेले असतात, याची माहिती कोणतीही आस्थापना सर्वांना देत नाही. मात्र मुक्त आणि व्यक्त या आज्ञावलींमध्ये मात्र त्या कशा पद्धतीने आणि कोणते रीती-सिद्धान्त वापरून तयार केल्या आहेत, हे नोंदवलेले असते. त्यामुळे कोणीही त्यात हवे तसे बदल करू शकतो आणि आपल्याला हवी तशी आज्ञावली बनवून घेऊ शकतो. हे करण्याचे स्वातंत्र्य प्रत्येक व्यक्तीला दिलेले आहे. त्यासाठी त्याने मूळ कर्त्याचे योग्य ते श्रेय नोंदवायला हवे

आणि आपण बदल केलेल्या साधनांचा वापर अन्य व्यक्तीनेही मुक्तपणे करावा, याचे स्वातंत्र्यही त्याने पुढे द्यायला हवे, या अटींचे पालन येथे केले जाते. सगळ्या जगाला संगणकाची मूलभूत आवश्यकता असताना, त्याचा वापर करण्यासाठी भविष्यकाळात लोकांना आपल्या उत्पन्नातील मोठा वाटा खर्च करावा लागू नये, या हेतूने ही चळवळ सुरू आहे. खरंतर आपण प्रत्येकानेच या चळवळीचा भाग होऊन आपले संगणकविश्व समृद्ध करायला हवे.

अनेक मराठीप्रेमी तंत्रस्नेही मंडळींनी अशा आज्ञावलींचे मराठीकरण करण्यात पुढाकार घेतला आहे. मात्र हे काम वैयक्तिक स्वरूपाचे आहे आणि त्यात सातत्य राहीलच अशी खात्री नसते. राज्य मराठी विकास संस्थेने 'संगणक आणि मराठी' या शीर्षकाखाली मुक्त आणि व्यक्त स्रोत स्वरूपात उपलब्ध असणाऱ्या संगणकीय आज्ञावल्यांचे मराठीकरण हा पहिला टप्पा हाती घेतला आहे. या मुक्त आज्ञावल्यांमध्ये (१) गिम्प (GIMP) : संगणकीय प्रतिमा-संपादनासाठीची आज्ञावली (फोटोशॉपचा मुक्त पर्याय) https://www.gimp.org/; (२) इंकस्केप (InkScape) : संगणकीय सदिश-प्रतिमा-संपादनाची आज्ञावली (कोरल-ड्रॉचा मुक्त पर्याय) https://inkscape.org; (३) ग्नू-कॅश (GnuCash) लेखाविषयक आज्ञावली (टॅलीशी समकक्ष) http://www.gnucash.org/; (४) स्क्रायबस (Scribus) https://www.scribus.net/ अक्षरजुळणीची आज्ञावली (पेजमेकर वा इनडिझाइनचा मुक्त पर्याय) सध्या ह्या आज्ञावलीत देवनागरीतला मजकूर नीट दिसत नाही. पण आज्ञावली मुक्त असल्याने तीत सुधारणा करणे शक्य आहे. (५) सिजिल (Sigil) इ-पब स्वरूपातील इ-पुस्तके तयार करण्याची आज्ञावली https://sigil-ebook.com/; (६) केडेनलाइव्ह (Kdenlive) मुक्त चलच्चित्रसंपादक https://kdenlive.org/; (७) ऑडॅसिटी (Audacity) मुक्त श्राव्यफीत-संपादक https://www.audacityteam.org/; (८) फॉण्टफोर्ज (FontForge) टंकसंपादनाची आज्ञावली http://fontforge.github.io/en-US/; (९) लिब्रेकॅड (LibreCAD) आरेखनाची आज्ञावली (ऑटोकॅडचा मुक्त पर्याय) http://librecad.org/cms/; (१०) लिब्रे ऑफिस (वर्ड, एक्सेल आणि पॉवरपॉइंट ह्यांचा मुक्त पर्याय) https://www.libreoffice.org/; (११) उबंटू - ही सगळी साधने ज्या कार्यकारी प्रणालीत चालवायची ती कार्यकारी प्रणाली उबंटू https://www.ubuntu.com/.

त्यापैकी उत्तर महाराष्ट्र विद्यापीठ, जळगाव यांनी गिम्प (GIMP) तर पुण्यातील आयएमसीसीने ऑडॅसिटी (Audacity) या आज्ञावलीच्या माहितीच्या धारिकांचे

मराठीकरण तसेच संवादपटलाचे (यूजर इंटरफेसचे) मराठीकरण यासाठी काम करण्यास प्रारंभ केलेला आहे. याच पद्धतीने आगामी २ वर्षांत उर्वरित १० आणि अन्यही काही साधनांचे मराठीकरण करण्याचा प्रयत्न राज्य मराठी विकास संस्था करणार आहे.

या बरोबरीनेच 'युनिकोड कन्सोर्शियम'चे सभासदत्व घेऊन मराठी टंकांचे योग्य रूप संगणकीय आज्ञावलींत वापरता यावे आणि मराठीच्या भावचिन्हांची वाढ करणे, गणितीय चिन्हे किंवा सांगीतिक चिन्हांचाही समावेश त्यात करता यावा यासाठीही राज्य मराठी विकास संस्था काम करत आहे. विकिपीडिया या मुक्त ज्ञानकोश प्रकल्पात अधिकाधिक मराठी लेखन व्हावे यासाठी दरवर्षी २५हून अधिक कार्यशाळा महाराष्ट्रात विविध ठिकाणी आयोजित करते आहे. यशोमुद्रा आणि यशोवेणू हे २ मराठी टंक उपलब्ध करून दिले आहेत. थोडक्यात हे काम पूर्ण झाल्यावर खऱ्या अर्थाने राज्य मराठी विकास संस्थेच्या घटनात्मक उद्दिष्टांची जशी पूर्ती होईल तशीच महाराष्ट्र शासन मराठीसाठी जे मनापासून प्रयत्न करत आहे, याचीही ओळख सर्व मराठी माणसांना होईल. आपली भाषा वापरून आपला संगणक आपण वापरू शकलो म्हणजे आपली भाषाही जगाच्या पाठीवरली एक विकसित भाषा असल्याचा अभिमानही आपण बाळगू शकू.

■

**माडगूळकरांचे प्रसन्न काव्य**

माडगूळकरांचा 'जोगिया' कवितासंग्रह १९५६मध्ये प्रसिद्ध झाला. त्याला प्रस्तावना लिहिण्याचं मर्ढेकरांनी ठरवलं होतं. ग०रा० कामतांना त्यांनी १९५३च्या प्रारंभी एक पत्र लिहिलं होतं, त्यात म्हटलं होतं, 'प्रस्तावना लिहिण्याचं एकदा कबूल केलं होतं, आजही तीव्र इच्छा आहे. पण कसं जमेल ते खरं. एक तर सध्या माझा माझ्यावरचा विश्वास पूर्ण उडाला आहे. यापुढे काही चांगलं-वाईट का होईना, पण आपल्याकडून काही लिहिलं जाईल असं वाटत नाही... माडगूळकरांच्या प्रसन्न काव्याला माझ्या प्रस्तावनेचं गालबोट म्हणजेच मी स्वत:चे हात दाखवून अवलक्षण. पण इच्छा आहे... छापले जातील तसे फॉर्म जरूर पाठवावे...' ही प्रस्तावना लिहिली गेली नाही. पण 'वाङ्मयीन महात्मते'चं प्रगल्भ विश्लेषण करणाऱ्या मर्ढेकरांनी पूर्वग्रहविरहित खुल्या रसिकतेनं माडगूळकरांच्या काव्याला दिलेली अशी दाद फार महत्त्वाची आहे.

# मराठी परिभाषा - कशी नसावी, कशी असावी?

**अरुण फडके**

**मा**झ्या भाषासंपादनाच्या कामांमुळे 'मराठी परिभाषा' ह्या विषयाची आवड मला सुमारे १५ वर्षांपूर्वी निर्माण झाली. मग त्यानिमित्ताने वाचन, कोशसंग्रह, विचार, संबंधितांशी चर्चा अशा गोष्टी सुरू झाल्या आणि त्यात मी छान रमायला लागलो. आपण एक 'सजीव परिभाषा कोश' करावा असा विचार सुमारे दहाएक वर्षांपूर्वी मनात आला आणि मी त्या कामाला सुरुवात केली. हे काम मी माझी नित्य व्यावसायिक कामं सांभाळून करतो. त्यामुळे ह्या कामाला मी नियमित वेळ देऊ शकत नाही. तरीही आज प्राणी, पक्षी, मासे, कीटक आणि वनस्पती ह्या सर्व सजीवांवरचं काम जवळपास पूर्ण झालं आहे आणि फक्त मानव शिल्लक राहिला आहे. अशा रीतीने ह्या विषयाशी माझा संबंध आला आणि ह्या विषयाचा थोडाफार अभ्यास झाला. हे काम करताना ह्या विषयाबद्दल माझा जो विचार झाला त्यातलेच काही मुद्दे आज इथे सोदाहरण मांडण्याचा प्रयत्न करणार आहे.

**उपलब्ध मराठी पारिभाषिक शब्दावलीची सक्षमता**

माझ्या ग्रंथसंग्रहात 'मराठी विश्वकोशाचा परिभाषासंग्रह', 'शासनाचे सुमारे ४५ विषयांचे परिभाषा कोश', 'डॉ० रघुवीर यांचा इंग्लिश-हिंदी परिभाषा कोश', सत्त्वशीला सामंत ह्यांचा 'शब्दानंद' हा त्रैभाषिक परिभाषा कोश असे तऱ्हेतऱ्हेचे ५०पेक्षा जास्त परिभाषा कोश आहेत. ह्यांपैकी डॉ० रघुवीर ह्यांच्या परिभाषा कोशातले हिंदी पारिभाषिक शब्द आपल्याला मराठीत वापरता येणार नाहीत. इतर परिभाषा कोशांमधल्या पारिभाषिक शब्दांचे परीक्षणात्मक निरीक्षण केल्यानंतर असे दिसते की आज आपल्याकडे मराठी पारिभाषिक शब्दावलीची संख्या सुमारे ४०,००० आहे. मराठीला ज्ञानभाषा करण्यासाठी आपल्याला सुमारे १,२०,००० एवढ्या पारिभाषिक शब्दांची गरज आहे.

शब्दसंख्या आणि स्वीकारार्ह शब्द असे दोन मुद्दे पारिभाषिक शब्दावलीच्या बाबतीत मला महत्त्वाचे वाटतात. एखादा पारिभाषिक शब्द स्वीकारार्ह होण्यासाठी तो सर्वसामान्य जनतेला सहज किंवा थोड्या प्रयत्नांनी समजेल असा असणं आवश्यक असतं. त्यामुळे ह्या उपलब्ध ४०,००० पारिभाषिक शब्दांपैकी स्वीकारार्ह शब्दसंख्या किती हा मुद्दाही मला महत्त्वाचा वाटतो.

ह्या दृष्टिकोणातून पाहता आजची पारिभाषिक मराठी शब्दावली सक्षम आहे असं मला वाटत नाही. त्यामुळे आधी ही शब्दावली सक्षम करण्याचं मोठं आणि महत्त्वाचं काम आपल्याला करायचं आहे.

**उपलब्ध कोशांमधले शब्द कसे आहेत?**

या सर्व कोशांमधून वेळोवेळी संदर्भ पाहताना, विशेषतः इंग्लिश-मराठी पारिभाषिक

कोशांमधले संदर्भ पाहताना मला एक गोष्ट जाणवली की, मराठी पारिभाषिक शब्द तयार करताना बहुतेक कोशांनी संस्कृतचा आधार फार मोठ्या प्रमाणात घेतला आहे आणि त्यामुळे अनेक पारिभाषिक मराठी शब्द बोजड आणि अनाकलनीय झाल्यामुळे ते अस्वीकारार्ह झाले आहेत. ह्याची अनेक उदाहरणं आपण पुढे पाहणार आहोत. पण आत्ता वानगीदाखल दोन उदाहरणं देतो. dentate - (दंतूर) दातेरी ; allergy - (अधिहर्षता. अधिहृषता), वावडे. कंसातील शब्द पारिभाषिक कोशातील तर नंतर आलेले अधोरेखित शब्द मी सुचवलेले आहेत. 'Dentate' ह्या इंग्लिश शब्दासाठी 'दातेरी', तर 'allergy' ह्या इंग्लिश शब्दासाठी 'वावडे' असे साधेसोपे मराठी शब्द उपलब्ध असताना पारिभाषिक कोशात मात्र अनुक्रमे 'दंतूर' आणि 'अधिहर्षता. अधिहृषता' असे मराठी माणसाला न कळणारे बोजड संस्कृत शब्द दिले आहेत.

**पारिभाषिक शब्दनिर्मिती कशी असावी?**

अशी बरीच अनाकलनीय उदाहरणं पाहिल्यावर मला असं वाटलं की, सुगम पारिभाषिक शब्द होण्यासाठी पुढीलप्रमाणे तीन धोरणं असावीत -

(१) केवळ मराठी शब्द करणे

(२) मराठी-संस्कृत संमिश्र शब्द करणे

(३) केवळ संस्कृत परंतु सोपा शब्द करणे

अशा धोरणांनी मी केलेले काही शब्द आपण पुढे पाहणार आहोत, पण त्याआधी भाषेची वैशिष्ट्यं आणि पारिभाषिक शब्दांच्या बाबतीत मराठी माणसाची मानसिकता यांविषयी मला काही सांगायचंय. कारण माझे पुढचे शब्द बघताना ह्या गोष्टींचा संबंध येणार आहे.

**भाषेची वैशिष्ट्यं आणि मराठी माणसाची मानसिकता**

कोणत्याही भाषेत फक्त वैशिष्ट्यंच असतात, वैगुण्य नसतातच; आणि त्या-त्या भाषेची वैशिष्ट्यं नीट समजून घेतली, तरच त्या भाषेविषयी सुदृढ दृष्टिकोण तयार होऊ शकतो, असं माझं मत आहे. मराठी पारिभाषिक शब्दांच्या बाबतीत निदान मला तरी मराठी माणसाची आजची मानसिकता फारशी सुदृढ दिसत नाही. 'इंग्लिश भाषा मराठी भाषेपेक्षा अधिक सामर्थ्यशाली आहे आणि म्हणूनच त्या भाषेत अनेक सार्थ पारिभाषिक शब्द भराभर तयार होऊ शकतात' अशी मराठी माणसाची समजूत मला तरी दिसते. 'इंग्लिशने एखादा शब्द दिला की तो त्याच्या अर्थासकट तत्काळ मान्य करायचा, आणि त्यासाठी मराठीने प्रतिशब्द दिला की मात्र त्याची अविचारी आणि अतिचिकित्सा करून त्यात दोष दाखवत राहायचं' अशी मराठी माणसाची मानसिकता मला दिसली.

नवे शब्द तयार करताना इंग्लिश ज्या-ज्या शब्दसिद्धींचा वापर करतं, त्या-त्या सर्व शब्दसिद्धींचा वापर कोणत्याही प्रादेशिक भाषेने करायला काहीच हरकत नाही. त्या सर्व भाषिक प्रक्रिया आहेत आणि कोणतीही भाषा त्या सर्व प्रक्रियांचा आणि त्यातून सुचलेल्या काही नव्या भाषिक प्रक्रियांचाही वापर करू शकते. अशा वेळी आपण इंग्लिश शब्दांकडे ज्या दृष्टिकोणातून पाहतो आणि ते शब्द विनातक्रार स्वीकारतो, त्याच दृष्टिकोणातून त्या-त्या प्रादेशिक भाषेकडे पाहण्याची मानसिकता आपण बाळगली पाहिजे.

थोडक्यात, मराठी माणसाने मराठी पारिभाषिक शब्दांकडे पाहण्याचा आपला दृष्टिकोण थोडा 'विशाल' केला; तर कितीतरी चांगले, सुलभ आणि अर्थवाही असे मराठी पारिभाषिक शब्द तयार होऊ शकतील.

आता मी सुरुवातीला नमूद केलेल्या माझ्या तीन धोरणांनुसार वेगवेगळ्या विषयांमध्ये केवळ मराठी, मराठी-संस्कृत मिश्र आणि केवळ संस्कृत असे सुगम पारिभाषिक शब्द आपण कसे तयार करू शकतो ते पाहू या. असे शब्द दाखवण्यासाठी मी कंस आणि अधोरेखित शब्द दर्शवून मांडणी केली आहे ती अशी - कोशांमधले संस्कृत शब्द, जे कदाचित कळायला कठीण असतील ते कंसात लिहिले जातील तर मी सुचवलेले शब्द, जे सहज कळतील असे असतील, ते अधोरेखित केलेले असतील.

• अवर्गीय प्राणी

digitigrade - (अंगुलचर, अंगुलिचारी) बोटचाली

plantigrade - (तलचर, पदतलचारी) तळवाचाली

saltigrade - (प्लुतिगति, प्लुतिचर) बागडचाली, उडचाली

unguligrade - (शफचारी) खूरचाली

प्राण्यांच्या चालण्याच्या पद्धतींनुसार त्यांचं वर्गीकरण केलं आहे. चारी म्हणजे चालणारा, अंगुल म्हणजे बोट, पदतल म्हणजे तळवा, प्लुती म्हणजे उडी, शफ म्हणजे खूर असे संस्कृत शब्दांचे अर्थ मराठी माणसाला माहीत नसतात. केवळ मराठी शब्द ऐकताक्षणी कळणारे झाले आहेत. आता दुसऱ्या विषयाचे केवळ मराठी शब्द पाहू.

• वनस्पती - बाह्यशरीरवैशिष्ट्ये

stalk - (दांडा, देठ, वृंत) देठ

pedicel - (देठ, पुष्पवृंत, वृंत) फूलदेठ

peduncle - (पुष्पबंधाक्ष, पुष्पविन्यासवृंत) गुच्छदेठ

petiole - (वृंत, पर्णवृंत) पानदेठ

देठांचे प्रकार दाखवणारे शब्द. देठ हा मराठी शब्द असताना वृंत हा संस्कृत शब्द

वापरण्याचं कारण नाही. नुसता वृंत हा शब्द तीन ठिकाणी वापरल्यामुळे अर्थभेद दाखवता आलेला नाही. पुष्पविन्यासवृंत ह्याचा अर्थ मराठी माणसाला कळणार नाही. सर्व मराठी शब्द थेट अर्थ सांगणारे आणि ठसठशीतरीत्या अर्थभेद दाखवणारे झाले आहेत.

आता मराठी-संस्कृत असा मिश्र प्रकार वापरून सोपे शब्द कसे करता येतात ते पाहू.

• प्राण्यांची बाह्यशारीरवैशिष्ट्ये

jettisonable tail - (x) विच्छेदक्षम शेपटी

prehensile tail - (परिग्राही........) पकडक्षम शेपटी

(x) अशी खूण म्हणजे हे शब्द पारिभाषिक कोशांमध्ये घेतलेले नाहीत.

पालीसारखे प्राणी त्यांच्यावर हल्ला झाल्यावर आपली शेपटी शरीरापासून विलग करून शत्रूचं लक्ष विचलित करतात आणि त्या संधीचा फायदा घेऊन पळून जातात. अशा प्रकारे शरीरापासून विलग करता येणाऱ्या शेपटीला विच्छेदक्षम शेपटी असा संस्कृत-मराठी सुगम शब्द होऊ शकतो.

Prehensile tail अशा पूर्ण शब्दसमूहाचा अर्थ पारिभाषिक कोशांमध्ये सापडत नाही, परंतु prehensile ह्याचा अर्थ परिग्राही असा दिला आहे. म्हणजे केवळ संस्कृतमध्ये पूर्ण शब्दसमूहाचा अर्थ 'परिग्राही पुच्छ' असा होईल, पण परिग्राही म्हणजे काय हे मराठी माणसाला कळणार नाही, त्यामुळे त्याला अर्थबोध होणार नाही. काही जातीच्या माकडांची शेपटी बरीच लांब आणि एवढी मजबूत असते की, ती एखाद्या फांदीला गुंडाळून आणि तिच्या आधाराने चारही पाय सोडून झाडावर दूर अंतरावर असलेलं अन्न ही माकडं सहज मिळवतात. अशा शेपटीला 'परिग्राही पुच्छ' म्हणण्याऐवजी पकडक्षम शेपटी असा मराठी-संस्कृत मिश्र तरीही सुलभ शब्द करता येतो. आता आणखी एका विषयाचे मराठी-संस्कृत मिश्र शब्द पाहू.

• पक्षी - बाह्यशरीरवैशिष्ट्ये

covert - (x) बाह्यपीस

plume - (x) शोभापीस

remex - (नाडीपत्र) उड्डाणपीस

tertial - (x) संरक्षकपीस

(x) अशी खूण म्हणजे हे शब्द पारिभाषिक कोशांमध्ये घेतलेले नाहीत.

पक्ष्यांच्या पिसांचे प्रकार दाखवणारे शब्द. ह्यांतले तीन शब्द तर पारिभाषिक कोशांनी घेतलेलेच नाहीत. नाडी आणि पत्र या दोन्ही शब्दांचे मराठी माणसाला माहीत असलेले अर्थ अगदीच वेगळे आहेत. त्यामुळे 'नाडीपत्र' ह्या शब्दावरून ते कोणतंतरी पीस आहे असा

अर्थबोध मराठी माणसाला होणार नाही. मराठी-संस्कृत मिश्रणामुळे सगळेच शब्द नेमका अर्थ सांगणारे सुगम शब्द झाले आहेत.

आता केवळ संस्कृतचा वापर करूनसुद्धा शब्द कसे सोपे करता येतात ते पाहू.

• खगोलशास्त्र

aphelion - (अपसूर्य ) सूर्यदूरबिंदू

perihelion - (उपसूर्य) सूर्यसमीपबिंदू

यांचे अर्थ समजून घेण्यासाठी आपण एक आकृती पाहू.

पृथ्वी सूर्याभोवती फिरताना सूर्य पृथ्वीपासून सर्वांत दूर असतो, तो सूर्यदूरबिंदू (aphelion); आणि सूर्य पृथ्वीच्या सर्वांत जवळ असतो, तो सूर्यसमीपबिंदू (perihelion). अप म्हणजे दूर, आणि उप म्हणजे जवळ असे ह्या उपसर्गांचे अर्थ मराठी माणसाला माहीत नसतात. शिवाय, सर्वांत दूरचे आणि सर्वांत जवळचे ही विशिष्ट ठिकाणं 'बिंदू' ह्या शब्दाने दाखवणं आवश्यक आहे. 'अपसूर्य' आणि 'उपसूर्य' ह्या संस्कृत शब्दांमधून ते साध्य होत नाही.

apogee - (अपभू ) पृथ्वीदूरबिंदू

perigee - (उपभू) पृथ्वीसमीपबिंदू या शब्दांचे अर्थ समजून घेण्यासाठी आकृती पाहू.

चंद्र पृथ्वीभोवती फिरताना पृथ्वी चंद्रापासून सर्वांत दूर असते, तो पृथ्वीदूरबिंदू (apogee); आणि पृथ्वी चंद्राच्या सर्वांत जवळ असते, तो पृथ्वीसमीपबिंदू (perigee). अशा रीतीने केवळ संस्कृत शब्दसुद्धा मराठी माणसाला सहज समजतील आणि तरीही ते योग्य अर्थवाही असतील असे करता येतात. आता असेच आणखी दोन शब्द पाहू.

nadir - (अधःस्वस्तिक) सरलनीचबिंदू

zenith- (खस्वस्तिक) सरलउच्चबिंदू ह्या शब्दांचे अर्थ समजून घेण्यासाठी एक आकृती पाहू.

स्वस्तिक म्हटल्यावर मराठी माणसाच्या डोळ्यांसमोर चार दिशांची आकृती असलेलं शुभचिन्ह येतं. परंतु nadir आणि zenith हे केवळ दोन बिंदू आहेत. पृथ्वीवरच्या कोणत्याही ठिकाणच्या निरीक्षकाच्या थेट पायथ्याखाली ९० अंशांमध्ये असलेला खगोलीय बिंदू म्हणजे सरलनीचबिंदू (nadir), आणि पृथ्वीवरच्या कोणत्याही ठिकाणच्या निरीक्षकाच्या थेट माथ्यावर ९० अंशांमध्ये असलेला खगोलीय बिंदू म्हणजे सरलउच्चबिंदू (zenith). केवळ संस्कृत शब्दसुद्धा असे सोपे होऊ शकतात.

**वेगवेगळ्या भाषिक प्रक्रियांनी होणारे पारिभाषिक शब्द**

इंग्लिश वेगवेगळ्या भाषिक प्रक्रिया वापरून पारिभाषिक शब्द तयार करते, तशाच

साऱ्या भाषिक प्रक्रिया वापरून मराठीतसुद्धा सोपे पारिभाषिक शब्द कसे तयार होऊ शकतात, ते आता पाहू.

• **स्वरूपाला अनुसरून -**

**(अ)** नदीमासे : discus - चकती, headstander - शीर्षासन

lungfish - फुप्फुसमासा, mosquitofish - डासमासा

माशांची जवळपास सर्वच नावं इंग्लिशने त्यांच्या स्वरूपाला अनुसरून केली आहेत. त्यामुळे आपणही आता स्वरूपाला अनुसरून काही शब्द करू या.

**(आ)** अवर्गीय सस्तन जलचर : dugong - (हस्तिमकर) फाळगाय

manatee - (करिमकर) वल्हागाय

समुद्रातल्या विशिष्ट जातीच्या काही अतिप्रचंड माशांना समुद्रगाय म्हणतात. जसा 'समुद्रघोडा' नावाचा मासा आपल्याला माहीत आहे, तशा ह्या समुद्रगायी असतात. Dugong आणि manatee यांमधला ठळक फरक दाखवणारं वर्णन असं सापडतं की, dugongची शेपटी नांगराच्या फाळासारखी दिसते, तर manateeची शेपटी वल्ह्यासारखी दिसते. त्यामुळे यांच्यासाठी 'हस्तिमकर' आणि 'करिमकर' असे कठीण शब्द करण्यापेक्षा इंग्लिशप्रमाणे यांच्या ठळक स्वरूपाला अनुसरून 'फाळगाय' किंवा 'फाळसमुद्रगाय', आणि 'वल्हागाय' किंवा 'वल्हासमुद्रगाय' असे सोपे शब्द आपण करू शकतो. शिवाय मकर म्हणजे मगर. ह्या माशांची तोंडं मगरीसारखी दिसत नसून गायीसारखी दिसतात. त्यामुळे त्यांना गाय म्हणणंच अधिक योग्य आहे.

आता उपयोगाला किंवा कृतीला अनसुरून होणारे कृषिशास्त्रातले काही शब्द पाहू.

• **उपयोगाला / कृतीला अनुसरून --**

hoe-farming - (x) फावडेशेती : ज्या शेतीमध्ये फावडं या अवजाराचा भरपूर उपयोग केला जातो, त्या शेतीला आपणही इंग्लिशप्रमाणेच उपयोगाला अनुसरून 'फावडेशेती' असं म्हणायला पाहिजे.

treading - (x) तुडवणी : Tread या क्रियापदाचा अर्थ बघता आणि शेतीमध्ये जमिनीची मशागत करण्यासाठी या कृतीचा केला जाणारा उपयोग पाहता treading या इंग्लिश शब्दाला 'तुडवणी' हा शब्द योग्य ठरतो.

broad-casting - (x) विखुरणे : Broad-castingचा अर्थ कोशांनी 'विखुरणे' असा दिला आहे. तर Sowing म्हणजे पेरणी. त्यामुळे 'विखरून केली जाणारी पेरणी' या कृतीला अनुसरून 'विखुरपेरणी' असा सुटसुटीत तरीही अर्थवाही शब्द करता येतो. broad-casting sowing - (फेकून पेरणे) विखुरपेरणी

आता अपभ्रंश करून केला गेलेला एक सोपा शब्द पाहू. Grouper हे एका नदीमाशाचं नाव आहे, पण ते त्याच्या स्वरूपावरून किंवा वर्तणुकीवरून ठेवलेलं नाही. पोर्तुगीज भाषेतल्या 'aroupa' या नावाचा अपभ्रंश इंग्लिशने grouper असा केला. त्यामुळे आपणही त्या माशाला त्याच्या पोर्तुगिजी नावाच्या जवळपास जाणारं 'गरुपा' हे नाव द्यायला काहीच हरकत नाही. grouper - (x) गरुपा

आता आपल्याला 'अक्षरबंध' या अतिशय महत्त्वाच्या भाषिक प्रक्रियेतून मराठीत तयार होऊ शकणारे काही शब्द पाहायचे आहेत. त्यासाठी आधी इंग्लिशने या भाषिक प्रक्रियेतून कोणते शब्द कसे तयार केले आहेत ते पाहू म्हणजे ही भाषिक प्रक्रिया कशी चालते ते आपल्याला कळेल.

- **अक्षरबंधाचा उपयोग करून --**

खगोलशास्त्र

pulsar - pulsating radiostar - स्पंदतारा

quasar - quasi-stellar - तीव्रदीप्त भासतारा

पूर्ण शब्दांमधल्या काही अक्षरांच्या आधाराने इंग्लिशने 'pulsar, quasar, sonar' हे उच्चारक्षम शब्द कसे तयार केले आहेत पाहा. या प्रकाराला 'अक्षरबंध' असं म्हणतात. यापैकी pulsarसाठी 'स्पंदतारा', तर quasarसाठी 'तीव्रदीप्त भासतारा' असे योग्य शब्द मराठीत आहेत.

- **प्राण्यांची अंतरीय शारीरवैशिष्ट्ये**

sonar - sound, navigation and ranging

sonar - (स्वनक, स्वनान्वेष)

sonar system - प्रतिध्वनिउगमशोध यंत्रणा प्रध्वशोध यंत्रणा

Sonar या शब्दाचे अर्थ कोशांमध्ये 'स्वनक, स्वनान्वेष' असे आहेत, पण या शब्दांमधून मराठी माणसाला अर्थबोध होऊ शकत नाही. त्यामुळे sonar system या शब्दाचा अर्थ सांगताना 'स्वनक, स्वनान्वेष' या शब्दांचा वापर करता येत नाही. Sonar system याचा अर्थ 'प्रतिध्वनिउगमशोध यंत्रणा' असा आहे. त्यामुळे इंग्लिशप्रमाणे 'अक्षरबंध' या प्रकाराचा उपयोग करून आपणही 'प्रध्वशोध यंत्रणा' अशी संज्ञा करू शकतो. ज्याप्रमाणे इंग्लिशमधले 'pulsar, quasar, sonar' हे शब्द वापरामुळे त्यांच्या अर्थासकट रूढ झाले, त्याप्रमाणे असे मराठी शब्दसुद्धा आपण रूढ करायला पाहिजेत.

- **कृषिशास्त्र**

enphytotic - (x) वनस्पतीचा प्रदेशविशिष्ट रोग == वनप्रविरोग

ecoagriculture - पर्यावरण अनुकूल शेती == पर्यानुकूलशेती

Cultivar - cultivated variety - (x) लागवड केलेली वनस्पती : लागवनस्पती

आता मला अगदी वेगळे पण अतिशय महत्त्वाचे असे दोन मुद्दे मांडायचे आहेत आणि त्या निमित्ताने एक वेगळी पद्धत तुमच्यासमोर विचारार्थ ठेवायची आहे.

**माद्यांची नावं :** प्राण्यांच्या आणि पक्ष्यांच्या माद्यांसाठी इंग्लिशप्रमाणेच मराठीतही मर्यादित शब्द आहेत ते असे -

**प्राण्यांच्या माद्या :** कुत्री, गाढवी, घोडी, मेंढी, हरिणी, उंटीण, हत्तीण, सिंहीण, वाघीण

**पक्ष्यांच्या माद्या :** कोंबडी, कावळी, कोकिळा, मयूरी/लांडोर, चिमणी

आता प्राण्यांच्या आणि पक्ष्यांच्या माद्यांची मराठी नावं पाहिली, तर असं दिसतं की, बहुतेक नावं ही नराच्या नावाला '-ई' किंवा '-ईण' यांपैकी एक प्रत्यय लावून झालेली आहेत. म्हणजे अशा प्रकारे स्त्रीलिंगी नावं तयार करणं ही मराठीची पद्धत आहे. मग ज्या माद्यांना नावं नाहीत, त्यांची नावं अशा पद्धतीने केली, तर ती कशी होतील पाहू.

**प्राण्यांच्या माद्या :** '-ई' आणि '-ईण' प्रत्ययांनी : अस्वली(ण), मगरी(ण), जिराफी(ण), गोरिली(ण), कांगारी(ण),बिबळी(ण), सशी(ण), गेंडी(ण), याकी(ण), झेब्री(ण)

**पक्ष्यांच्या माद्या :** '-ई' आणि '-ईण' प्रत्ययांनी : बदकी(ण), ससाणी, चंडोली(ण), शहामृगी(ण), कबुतरी(ण), सुतारी(ण)

**पिल्लांची नावं :** माद्यांप्रमाणेच प्राण्यांच्या पक्ष्यांच्या पिल्लांनाही इंग्लिशप्रमाणेच मराठीतही मर्यादित शब्द आहेत ते असे -

**प्राण्यांची पिल्लं :** रेडकू, वासरू, कोकरू, मेंढरू, तट्टू, पाडस, छावा, बछडा

एरवी मराठीत बोलताना आपल्याला 'कुत्र्याचं पिल्लू, मांजराचं पिल्लू' असं म्हणावं लागतं. पण प्राण्यांच्या पिल्लांची उपलब्ध मराठी नावं पाहिली, तर असं दिसतं की, बहुतेक नावं 'ऊकारान्त' आहेत. मग इतर नावं अशा पद्धतीने केली, तर ती कशी होतील पाहू.

**प्राण्यांची पिल्लं '- ऊकारान्त' पद्धतीने :** मुंगू, अस्वलू, मांजरू, मगरू, कुत्रू, गाढवू, हत्तू, खोकडू, जिराफू, गोरिलू, बिबळू, उंदरू, डुकरू, गेंडू, ससू, लांडगू/लांडरू, याकू, झेब्रू

प्राण्यांची पिल्लं '-उकला, -उकली' प्रत्ययांनी : उंटुकला, माशुकली, ससुकला, घुसुकली, खारुकली

पक्ष्यांच्या पिल्लांसाठी तर मराठीत शब्दच नाहीत असं दिसतं. इंग्लिशमध्येही पक्ष्यांच्या पिल्लांसाठी अगदीच मर्यादित व्यवस्था आहे. आता प्राण्यांच्या पिल्लांच्या नावांप्रमाणे पक्ष्यांच्या पिल्लांची नावं '-ऊकारान्त' केली, तर ती कशी होतील पाहू.

**पक्ष्यांची पिल्लं :** -ऊकारान्त' पद्धतीने : कोंबडू, कावळू, बदकू, ससाणू, हंसू, खंडू, टिटवू/टिटू, चंडोलू, घुबडू, पोपटू, मोरू, सुतारू

वर नमूद केल्याप्रमाणे प्राण्यांच्या आणि पक्ष्यांच्या माद्यांची आणि पिल्लांची नावं करण्याची पद्धत आपण स्वीकारली, तर प्रत्येकाला एक नाव मिळेल आणि त्यामुळे संवाद आणि लेखन यांमध्ये स्पष्टता येण्याबरोबरच एक सोय निर्माण होईल.

**नवीन क्रियासूचक नामं करणं :** आता मला तुमच्यासमोर आणखी एक पद्धत विचारार्थ ठेवायची आहे. असं म्हणतात की, we landed साठी स्वातंत्र्यवीर सावरकरांनी 'आम्ही जमिनलो' असा शब्दप्रयोग केला होता. म्हणजे त्यांना जणू असं सुचवायचं होतं की, जमीन या नामापासून 'जमिनणे' असं क्रियासूचक नाम करावं आणि मग जमीन ह्या नामाचा उपयोग धातूसारखा करून त्यापासून 'जमिनलो' असं क्रियापद करावं. अशा प्रकारे जमीन हा धातू झाला, तर 'आम्ही जमिनलो', 'तुम्ही कधी जमिनताय' 'आम्ही उद्या जमिनू' 'तुम्ही जमिनल्यावर कळवा' अशी वाक्यं किंवा असे संवाद होऊ शकतील. सावरकरांनी त्या वेळी सुचवलेला हा मार्ग आज वैज्ञानिक आणि तांत्रिक भाषा करण्यासाठी खूप उपयुक्त ठरणार असल्यामुळे आपण त्याचा अवलंब करावा असं वाटतं. असं केलं, तर क्रियासूचक नामं कशी होतील याची काही उदाहरणं पाहू.

टपाल - टपालणे - to post      मार्गदर्शन - मार्गदर्शणे - to guide

सादर - सादरणे - to perform      प्रयोग - प्रयोगणे - to experiment

असं केल्यामुळे 'टपालात टाकणे, टपाल पाठवणे, मार्गदर्शन करणे, सादर करणे, प्रयोग करणे' अशी 'द्विशब्दी क्रियासूचक नामं' करावी लागणार नाहीत. 'टपाल, मार्गदर्श, सादर, प्रयोग' असे धातू मिळतील आणि त्यांपासून 'टपालून आलो, मार्गदर्शतो, सादरीन, प्रयोगतोय' अशी क्रियापदं वापरता येतील आणि एक वेगवान भाषा तयार करता येईल.

**समारोप**

इंग्लिश शब्द आणि पर्यायी मराठी शब्द पाहताना कोणकोणत्या ठळक गोष्टी आपण पाहिल्या त्या आणि त्यानुसार नव्या पारिभाषिक कोशात काय असायला पाहिजे याचा आढावा घेऊ.

पारिभाषिक शब्दांची संख्या वाढवणे; केवळ मराठी, मराठी-संस्कृत किंवा केवळ संस्कृत यापैकी एका मार्गाने आणि वेगवेगळ्या भाषिक प्रक्रिया वापरून सुलभ आणि अर्थवाही शब्द तयार करणे; मराठी माणसाने आपली मानसिकता बदलून नव्या पारिभाषिक शब्दांकडे अधिक विशाल आणि वैचारिक मानसिकतेतून पाहून ते शब्द स्वीकारणे; सर्व माद्यांना आणि पिल्लांना स्वतंत्र नावं मिळावीत यासाठी काही उपाययोजना करणे; नवीन

क्रियासूचक नामांची निर्मिती करून त्यांपासून धातू मिळवणे आणि मग त्यांपासून 'क्रियापद, नाम, विशेषण, क्रियाविशेषण' अशी एकाच शब्दाची चार रूपं होणाऱ्या शब्दांची संख्या वाढवणे; गरजेनुसार काही नवीन उपसर्ग आणि प्रत्यय तयार करणे असे विविध उपाय आपण सोदाहरण पाहिले.

मराठीला ज्ञानभाषा करायची असेल, तर हे सर्व आणि नवीन सुचतील ते सारे योग्य उपाय वापरून मराठीतून अधिकाधिक ज्ञान उपलब्ध करून द्यावं लागेल.

■

*[दि० ४ मार्च २०१८ रोजी झालेल्या सत्त्वशीला सामंत स्मृती-व्याख्यानप्रसंगी वक्त्यांनी मांडलेले विचार]*

**गदिमांची असामान्य प्रतिभा**

संत जनाबाईच्या एका पदात 'विठ्ठला धुंद तुझा दरबार' असा एक चरण आहे, त्यावरूनच माडगूळकरांनी 'उद्धवा अजब तुझे सरकार' हे गीत रचले. अन सूरदासाच्या 'अब मैं नाचो बहुत गुपाल' या गीताचा उपयोग करून 'नाच नाचुनि अति मी दमले, थकले रे नंदलाला' असे मराठीकरण करून टाकले. 'बाई मी विकत घेतला श्याम' या गीताचे मूळ मीराबाईच्या 'माई मैंने गोविंद लीनो मोल' या रचनेत सापडेल.

मराठीत जशी भूपाळी असते तशी गुजरातीत 'प्रभाती' असते. अशा एका गुजराती प्रभातीची पहिली ओळ आहे- 'जागीने जादवा नंद गोवाळिया.' माडगूळकरांनी या ओळीचे प्रसन्न मराठी रूप उभे केले – 'जाग रे यादवा नंद गोपालका.'

सूरदासांची एक गोड रचना आहे – 'उधो मन नाही दस बीस'. माडगूळकर या कल्पनेचा मराठी आविष्कार कसा दाखवतात ते पाहा. 'दहा-वीस असती का रे मने उद्धवाला । एक मात्र होते ते मी दिले माधवाला ॥'

हे सगळे नोंदताना, माडगूळकर परभाषेतल्या रचना उचलून आणत होते असे म्हणण्याचा बिलकुल उद्देश नाही, तर ते त्या त्या भाषेतल्या उत्तमोत्तम रचनांना आपले विशिष्ट असे एक परिमाण देऊन पुनर्निर्मिती करत असत आणि हे कार्य आपल्याला स्वतंत्र गीतरचनेइतकेच महत्त्वाचे वाटते.

- शांता शेळके





अनुक्रमणिका

## देणे शब्दप्रभूंचे...

शिल्पा नेवे

**मा**झ्या आठवणीप्रमाणे, माझ्या संस्कारक्षम वयात साधारण १९८२ साली घरात टेपरेकॉर्डर आला. नॅशनल पॅनासॉनिकची फक्त एक ध्वनिमुद्रिका वाजविण्याची सोय असलेल्या त्या साधनाचे तेव्हा अप्रूप आणि कौतुक वाटले होते. आईवडिलांनी भरपूर कोऱ्या कॅसेट्स घेऊन मराठी गाणी भरून आणलेली मराठी बालगीते, भक्तिगीते, भावगीते, चित्रपटगीते, नाट्यगीते, गीतरामायण असे नामकरण केलेल्या या कॅसेट्स कामे उरकताना, अभ्यास करताना, झोपण्यापूर्वी, पार्श्वभूमीला वाजू लागल्या. गाणी नकळत पाठ होऊ लागली. जोडीला 'आपली आवड', 'कामगारसभा', 'विविधभारती' अशी आकाशवाणीची मेजवानी असायचीच. यावर्षी महाविद्यालयात मराठी भाषादिनाला गदिमा, सुधीर फडके, पु०ल० देशपांडे आणि राम गणेश गडकरी यांच्या जन्मशताब्दी आणि स्मृतिशताब्दीच्या निमित्ताने त्यांच्या साहित्य-कला-संगीत क्षेत्रांतील कर्तृत्वावर आधारित कार्यक्रम करायचे ठरले. त्यानिमित्ताने या दिग्गजांच्या कार्यकर्तृत्वाचा शोध घेत असताना लक्षात आले, 'अरेच्या! याच व्यक्तींनी तर आपले बालपण समृद्ध करून टाकलेय. तेव्हापासून मनात रुतून राहिलेली, केव्हाही आठवणारी आणि गुणगुणली जाणारी कितीतरी गीते तर गदिमांचीच!'

गदिमा अर्थात ग०दि० माडगूळकरांची ही गीते आजही सहज ओठांवर खेळतात याचे मुख्य कारण म्हणजे त्यांच्या भाषेतील प्रासादिकता. साक्षर – निरक्षर – शहरी – ग्रामीण अशा कोणत्याही काळजाचा ठाव घेणारी अत्यंत सहज रचना! 'हलकेच कळ्यांनो उमला, लागली झोप बाळाला' हे 'पहिला पाळणा' या मराठी चित्रपटासाठी माडगूळकरांनी लिहिलेले त्यांचे पहिले चित्रपटगीतच खूप गाजले. या गीताने कोल्हापुरात मेळ्यासाठी पदे लिहिणाऱ्या या कवीचा चित्रपटगीतलेखक म्हणून प्रवेश झाला. झोक्यात झोपणाऱ्या बाळाला निजविण्यासाठी दिल्या जाणाऱ्या हलक्या झोक्यासारखीच नाजुक भावनांना आंदोलित करणारी लय या गीतात त्यांनी साधली आहे.

गदिमांची गीते आपल्या विस्मरणात जात नाहीत कारण आपल्या मनःपटलावर त्यांनी एक चित्र रेखाटलेले असते. ती जेव्हा जेव्हा आपल्याला आठवतात तेव्हा या चित्रासहच आठवतात. दृश्यात्मक परिणाम साधणारी गतिमान काव्यभाषा हे या गीतरचनेचे वैशिष्ट्यच. उदा० 'त्या तिथे, पलीकडे, तिकडे; माझिया प्रियेचे झोपडे' हे ऐकता ऐकता आपल्या डोळ्यांसमोर दृश्य साकार होऊ लागते.

गवत उंच उंच दाट
वळत जाय पायवाट
वळणावर आंब्याचे
झाड एक वाकडे!

प्रत्येक ओळीबरोबर या दृश्यातला एक एक तपशील उठाव घेऊ लागतो. जणू एक एक खूण तपासत आपण पायवाटेने प्रियेच्या घरी पोहोचू लागतो. प्रियेच्या घराचा सर्व खाणाखुणांसह सांगितलेला हा पत्ता किती लडिवाळ असावा! अगदी झोपडे, तिकडे, पलीकडे, वाकडे इ० 'ड' या मृदू – कोमल नसलेल्या वर्णाने युक्त शब्दांचे आधिक्य असूनही!

माडगूळकरांनी बरेचसे गीतलेखन चित्रपटांसाठी केले. चित्रपटातील गीतांमध्ये 'अभिनय' हा घटक येतोच. त्यामुळे अशा गीतांमध्ये दृश्यात्मक भागही असावा लागतोच. म्हणूनच माडगूळकरांचे कोणतेही गीत असो, आपण ते फक्त कानांनी ऐकत नाही तर मनःपटलावर दृश्यही पाहत असतो. माडगूळकर हे श्रीधर कवींच्या नाझऱ्याजवळच्या सांगली जिल्ह्यात येणाऱ्या माडगूळ या लहानशा गावात वाढले. तिथल्या ग्रामजीवनाचे आणि तत्कालीन ग्रामजीवनाचा अविभाज्य भाग असणाऱ्या ओव्या, अभंग, भजनं, पारायणं, गौळणी, भारुडं, शाहिरी कविता यांचे त्यांच्या काव्यभाषेवर खोल संस्कार आहेत. तसंच चित्रे उभी करत बोलणे, दाखले देत बोलणे ही खास ग्रामीण लकब आहे. चावडीवर, देवळाच्या ओटीवर, निंबाच्या पारावर माणसं अशीच चित्रमय भाषेत बोलत असतात. 'गदिमा' या पुस्तकाच्या प्रस्तावनेत माडगूळकरांच्या या चित्रमय काव्यभाषेची मुळं नेमकी हेरणाऱ्या पु०ल० देशपांड्यांनी आपल्या नाटकात ग्रामीण पात्रे रंगवताना याच चित्रमय भाषेचे उपयोजन केले आहे. माडगूळकरांच्या भाषेचे भरण-पोषण ग्रामीण जीवनात झालेले असल्याने ती इंग्रजीचा अजिबात प्रभाव नसलेली अस्सल मराठमोळी भाषा आहे.

माडगूळकरांच्या गीतरचनेचा विचार करताना सर्वाधिक लक्ष वेधून घेते ती गीतरचनेची विविधता आणि विपुलता. या वैविध्य-वैपुल्यामुळेच त्यांचे गीतविश्व विलक्षण संपन्न झाले आहे. प्रेम-वात्सल्य, शृंगार, निसर्ग, समाज-जगरहाटी, तत्त्वज्ञान-उपदेश, भक्ती, बालविश्व, मनोवृत्ती अशा अनेक विषयांनी हे गीतविश्व बहरलेले आहे. गीतरचनेसाठी वेगवेगळे घाट माडगूळकर वापरतात. साधारण दोन ते सहा कडव्यांची रचना आढळून येते. मुख्यत्वे चित्रपटासाठी गीतलेखन झाल्याने अधिकतर रचना तीन कडव्यांची आहे. गीतारंभी दोन ओळींचे ध्रुवपद आणि तीन ओळींचा अंतरा अशी रचना आढळते. प्रत्येक अंतऱ्यात यमक साधणाऱ्या दोन पंक्ती येतात तर तिसरी पंक्ती ध्रुवपदशी यमक साधते.





अनुक्रमणिका

चांदण्यात चालू दे मंद नाव नाविका
तरंगती जलावरी संथ चंद्र-चंद्रिका ।
नकोच आज बोलणे
बोलु देत लोचने
लोचनात रंगल्या भावना अनामिका ।

कधी ध्रुवपदची पहिली ओळ कमी शब्दांची, दुसरी अधिक शब्दांची; तर कधी ध्रुवपदाच्या पहिल्या ओळीतल्या शेवटच्या शब्दाची दुसऱ्या ओळीत पुनरावृत्ती साधणे; तर कधी एकाच ओळीचे ध्रुवपद असे प्रयोग केलेले आढळतात. उदा०

कबीराचे विणतो शेले, कौसल्येचा राम
कौसल्येचा राम बाई, कौसल्येचा राम

किंवा कधी "सांग, तू माझा होशील का?" असे एका ओळीचे ध्रुवपद वापरून तर कधी गं, रे, तू, जा असा एखादाच झोकदार एकाक्षरी शब्द आणि कधी त्याचे आवर्तन योजून लय साधली जाते.

नकोस नौके परत फिरू **गं**, नकोस गंगे ऊर भरू
हवास **तू**, हवास **तू**, हवास मज **तू**, हवास **तू**
जपून **जा** गडे जपून **जा**
जिवलगा...... राहिले **रे** दूर घर माझे
**का** रे दुरावा, **का** रे अबोला
पावसाची रिमझिम थांबली **रे**

अशी कितीतरी गीते या दृष्टीने पाहता येतील. गीताची मुख्य कल्पना ध्रुवपदात मांडून अंतऱ्यात त्याचा विस्तार केला जातो. तीन ओळींच्या अंतऱ्याबरोबर चार ओळींचा अंतराही काही गीतांत येतो.

नेसला मलीन चिंधोटी
घेतली हातामध्ये काठी
घोंगडी टाकिली पाठी
करी जोहार दरबारात ।
झाला महार पंढरीनाथ...

साध्या सोप्या शब्दांतून अर्थसघनतेपर्यंत जाणे हा माडगूळकरांच्या गीतलेखनशैलीचा खास विशेष. अर्थाचा गहन डोह निर्माण करण्याची देणगीच जणू त्यांना लाभली होती.




अनुक्रमणिका

'फिरत्या चाकावरती, देशी मातीला आकार, विठ्ठला तू वेडा कुंभार!', 'पराधीन आहे जगती पुत्र मानवाचा, दोष ना कुणाचा', 'एक धागा सुखाचा, शंभर धागे दुःखाचे, जरतारी हे वस्त्र माणसा तुझिया आयुष्याचे' अशा कितीतरी गीतांचा संदर्भ इथे घेता येईल. मानवी जीवनविषयक तत्त्वज्ञान अत्यंत सुलभ आणि मोजक्या शब्दांत माडगूळकर सांगतात. चित्रपटासाठी वापरण्यात येणाऱ्या गीतांना वेळेचे बंधन असल्यामुळे मितव्ययी शब्दयोजना आपोआपच साधली जाते. कमीत कमी चरणांच्या गीतांत जास्तीत जास्त काव्यगुण येण्यासाठी माडगूळकर प्रयत्नशील दिसतात.

ग्रामजीवनातून संतसाहित्याचे जे संस्कार त्यांच्यावर झाले त्यातून ही तत्त्वरुप अध्यात्मप्रवणता त्यांच्या गीतांत अवतरताना दिसते. माडगूळकरांच्या गीतांत अवतरणारा हा आध्यात्मिक सूर आपण आस्तिक- नास्तिक कसेही असलो तरी आपल्याला आकर्षून घेतो, एक हुरहुर लावतो.

पोटापुरता पसा पाहिजे नको पिकाया पोळी
देणाऱ्याचे हात हजारो, दुबळी माझी झोळी

पुराणं-पारायणं यांच्या संस्कारातून कितीतरी गीतांत पौराणिक कथांमधील रुपके, वातावरण यांचा उपयोग मानवी मनातले वेगवेगळे भाव व्यक्त करण्यासाठी केला जातो. मग कुणी अभिसारिका स्वतःला दमयंती समजू लागते.

राजहंस सांगतो कीर्तीच्या तुझ्या कथा
हृदयी प्रीत जागते जाणता, अजाणता

तर "जा मुली शकुंतले सासरी..." सासरी लेकीची पाठवणी करणाऱ्या बापाच्या भावना, मनःस्थिती कण्व-शकुंतलेच्या रूपकातून व्यक्त होते.

मराठी लोकमानसाशी निकटचे नाते असणाऱ्या गदिमांच्या गीतात मराठी ग्रामीण मनात मुरलेली अध्यात्मप्रवणता जशी अवतरते तशीच लोकमानसाला प्रिय असलेली शाहिरी ढंगाची प्रीतीही! शाहिरी काव्यातला प्रेमाचा रंगढंग माडगूळकरांनी 'बाई माझी करंगळी मोडली', 'माझ्या व्हटाचं डाळिंब फुटलं', 'बाई मी पतंग उडवीत होते', 'तुझ्या उसाला लागल कोल्हा' अशा कितीतरी लावण्यांतून खुलवलेला आहे.

माडगूळकरांनी रंगविलेलं लहान मुलांचं भावविश्व तर याहून अद्भुत आहे. त्या बालगीतातली कल्पनासृष्टी मुलांसारखीच, गोड, हसरी, नाचरी, कल्पनेच्या उंच भराऱ्या घेणारी आहे. शब्दकळाही खास बालसृष्टीतली आहे. उत्साहाने रसरसलेल्या या मुलांपैकी कोणाला आंब्याच्या वनात नाचणाऱ्या मोराशी जोडी जमवायची आहे तर कोणा सानुलीला

दादाकडून गोरी गोरी पान वहिनी हवी आहे, अगदी तिच्या बाहुलीसारखीच! वहिनीसाठी आणि वहिनीबरोबर काय करायचे याचे मनोरथ रचण्यात ती दंग आहे. काही बच्छड्यांना मामाच्या गावाला जायची ओढ लागली आहे. तिथे होणारे लाड आणि मज्जा यांच्या कल्पनेने ते बेहोषून गेले आहेत. भाचरांना असणारा मामाचा लळा आणि मामाविषयीचा अभिमान या गीताने नेमका पकडला आहे. प्राणिजगतात शेपटीवाल्या प्राण्यांची सभा भरते तर कधी घराघरातल्या ताई-दादांचा आई चांगली की कधी बाबा, हा नेहमीचा वाद गीतरूप धारण करतो आणि गीतरूप युक्तिवादाचा अनुभव देतो. मुलांसाठी लिहितानाही माडगूळकरांमधला तत्त्वप्रतिपादक अधूनमधून डोकावत राहतोच. 'एका तळ्यात होती बदके पिले सुरेख...' या गीताचे उदाहरण इथे सयुक्तिक ठरेल.

माडगूळकरांना 'आधुनिक वाल्मिकी' या उपाधीपर्यंत नेणारा त्यांच्या गीतरचनेचा कळसाध्याय म्हणजे अर्थातच 'गीतरामायण'! भावगीतात्मक रचनेचा अवलंब करून सलग कथा उभी करण्याचा प्रयोग गदिमांपूर्वी महाराष्ट्रकवी यशवंत यांनी 'जयमंगला' या खंडकाव्याद्वारे केलेला दिसतो. पण 'जयमंगला' आणि 'गीतरामायण' यांमागील प्रेरणा – हेतू भिन्न प्रकारचे आहेत. एका महाकाव्यातली छंदोबद्ध कथा वर्षातील ५२ आठवड्यांमध्ये ५२ भावगीतरूप गीतांमधून साकार करण्याचे मोठे आव्हान गदिमांनी अत्यंत यशस्वीरीत्या पेलले. प्रदीर्घकाळ चित्रपटांसाठी गीतलेखन करण्याच्या त्यांच्या दांडग्या अनुभवाचा अर्थातच या यशात वाटा आहे. त्यांच्या चित्रपटगीतांच्या तुलनेत गीतरामायणातली रचना थोडी पसरटच आहे. आठ ते तेरा कडव्यांपर्यंत गीतरचना आढळून येते. पण एक एक कथाप्रसंग सर्व तपशीलांसह सादर करायचा असल्याने गीत थोडे पसरट होणे साहजिक आहे. गीतरामायणाच्या यशाचे श्रेय केवळ संगीताला देऊन चालणार नाही. प्रत्येक गीताचे स्वतंत्र व्यक्तित्व राखून त्यात कथाअंश उतरवायचा, सर्व गीतांचा परस्परांशी आंतरिक संबंध साधायचा आणि त्याबरोबरच मोजक्या उचित शब्दयोजनेद्वारे महाकाव्याच्या आशयाची भव्यता, उदात्तताही रसिकहृदयावर कोरली जाईल याची दक्षता घ्यायची हे निश्चितच अवघड कार्य होते. हा योग साधण्यासाठी माडगूळकरांनी कसोशीने प्रयत्न केले. उपलब्ध माहितीनुसार गदिमा दर आठवड्याला त्या त्या आठवड्याचे गीत रचत असत. एकटाकी लेखन नसूनही हा परिणाम त्यांना साधता आला तो अद्वितीय प्रतिभेमुळेच. गीतरामायणाचा आरंभ 'स्वये श्री रामप्रभू ऐकती, कुशलव रामायण गाती' या गीताने होतो. आरंभीच्या गीतात कुश–लव हे रामपुत्र निवेदक असले तरी एकसुरीपणा

टाळण्यासाठी माडगूळकरांनी कथक बदलते ठेवले आहेत. रामजन्माचा आनंद अयोध्येतल्या स्त्रियांकडून, सीतास्वयंवराचा प्रसंग भाटांच्या तोंडून तर वनवासाला जाताना

शरयू ओलांडण्याचा प्रसंग अयोध्यावासीयांकडून मुखर होतो. अधूनमधून संघगीतांचा कौशल्याने उपयोग माडगूळकर करतात. देश, काल, निसर्ग, घटना, प्रसंग, मानवी नातेसंबंध, व्यक्तिचित्रे, स्वभावपरिपोष, उत्सव, सुख-दुःखे, संघर्ष हा महाकाव्याचा सगळा पट एकूण ५६ गीतांमधून त्यांनी उलगडला आहे. पु०ल० देशपांडे 'गदिमा' या पुस्तकाच्या प्रस्तावनेत म्हणतात, "माडगूळकर लिहायला लागले म्हणजे वाटते की कुठूनतरी अदृश्य वाल्मिकी त्यांना सांगत जातो आणि हा गजानन ते उतरीत जातो." बा०भ० बोरकरांनी म्हटले आहे, "इथे शब्दांना सिनेकॅमेऱ्याची शक्ती आली आहे," तर संगीतकार सुधीर फडके म्हणतात, "आकाशवाणीच्या पुणे केंद्रावर गीतरामायणाचा झालेला अवतार ही मराठी गीतसृष्टीतील व भारतीय आकाशवाणीच्या इतिहासातील एक आश्चर्यकारक व अद्भुत घटना होय." पुढे गीतरामायण हिंदीतही लोकप्रिय झाले. मराठीत गीतमालेची परंपरा सुरू झाली. नंतर माडगूळकरांनी स्वतःच्याच अनुकरणाने 'गीतगोपाल' रचले.

माडगूळकरांच्या गीतांत जशी आशय आणि शब्दकळा यांची सुयोग्य संगती साधली जाते तशीच भावना आणि लय-संगीत यांचीही एकतानता प्रत्ययाला येते. लयीचे अखंड भान त्यांनी राखले आहे. लयीअंतर्गत विराम, आघात, खटके, गती यांची उत्तम जाण त्यांच्यातल्या गीतकाराला असल्याने त्यांची गीतरचना लालित्यपूर्ण झाली आहे. उदा०

पदरावरती, जरतारीचा मोर नाचरा हवा;
आई मला, नेसव शालू नवा"

या चरणांतील चित्रलयीतील विराम, खटक्यामुळे त्यातील अभिनयासकट ती आपल्या दृश्यपटलावर उलगडत जाते आणि तरीही लय अर्थावर अतिक्रमण करत नाही हे विशेष. म्हणून माडगूळकरांच्या गीतरचनेत कवी भावकवितेप्रमाणेच केंद्रस्थानी असलेला दिसतो.

कवी आणि गीतकार यांच्या भूमिका आणि प्रेरणा भिन्न असल्या तरी त्या दोन्ही एकाच व्यक्तीच्या ठिकाणी नांदू नयेत असे काही नाही. दोघेही अखेर कलावंतच असतात आणि दोघांनाही एकच गोष्ट साधायची असते ती म्हणजे 'निर्मिती'. माडगूळकरांना भावकवितेची चांगली जाण असल्याने त्यांच्या एकूण रचनेत आकर्षक संमिश्रता उतरली आहे असे विवेचन प्रा० रमेश तेंडुलकरांनी केले आहे. 'जोगिया', 'पूरिया'सारख्या त्यांच्या कवितासंग्रहांत त्यांच्यातल्या गीतकाराची छाया जाणवते; तर त्यांच्या गीतांमधून त्यांच्यातला भावकवी आपले लक्ष वेधून घेत राहतो. म्हणूनच गदिमांबाबत वारंवार उपस्थित केलेल्या 'कवी की गीतकार' या प्रश्नाच्या चर्चेत पडण्याची गरज नाही असे मला वाटते. 'गीत' या संज्ञेला प्राचीन परंपरा असून तोही एक कविताप्रकार आहे. कविताप्रकारांत भेद हा असणारच. या प्रकारभेदांची चर्चा जरूर व्हावी; पण त्यामुळे भावकवी श्रेष्ठ आणि





अनुक्रमणिका

गीतकार थिटा असे मानण्याची गरज नाही. जावेद अख्तर, गुलजार यांचा कवी म्हणून उल्लेख आज केला जातोच की! गीतकार माडगूळकरांना जरी लोकप्रियता, मानसन्मान लाभला असला तरी सातत्याने होत राहिलेल्या वरील चर्चेमुळे त्यांच्यातल्या 'कवी'बरोबरच त्यांच्यातला 'लेखक'ही उपेक्षित राहिला. त्यामुळे माडगूळकरांनी लिहिलेल्या कथा, कादंबरी, ललितगद्य यांचा फारसा विचार मराठी साहित्यप्रांतात झालेला दिसत नाही याची खंत वाटते.

■

**महाराष्ट्र-वाल्मीकी गजानन दिगंबर माडगूळकर : जीवनपट**

(जन्म : शेटफळे-सांगली जिल्हा, १ ऑक्टोबर १९१९;
मृत्यू : पुणे, ४ डिसेंबर १९७७)
पद्मश्री (१९६९), अ०भा०मराठी साहित्यसंमेलनाचे अध्यक्ष, यवतमाळ (१९७३)
महाराष्ट्र राज्याच्या विधानपरिषदेचे नियुक्त सदस्य
**चित्रपटगीते :** भक्त दामाजी (१९४२), पहिला पाळणा (१९४२)
**चित्रपटाची कथा-संवाद आणि गीते :** लोकशाहीर रामजोशी (१९४७)
**गीते, कथासंवाद आणि अभिनय :** पुढचं पाऊल, बाळा जो जो रे, लाखाची गोष्ट, पेडगावचे शहाणे, ऊन पाऊस, मी तुळस तुझ्या अंगणी, जगाच्या पाठीवर, संथ वाहते कृष्णामाई इत्यादी १५०हून अधिक मराठी चित्रपट,
**कथासंवाद :** तूफान और दिया, दो आँखे बारह हाथ, गूँज उठी शहनाई इत्यादी १५ हिंदी चित्रपट
**मराठी चित्रपटांसाठी लिहिलेल्या गीतांचा संग्रह :** चैत्रबन (१९६२)
**मराठी चित्रकथा :** तीन चित्रकथा (१९६३)
**नाटक :** युद्धाच्या सावल्या (प्रयोग, १९४४)
**कविता :** जोगिया (१९५६), चार संगीतिका (१९५६), काव्यकथा (१९६२), गीत रामायण (१९५७), गीत गोपाल (१९६७), गीत सौभद्र (१९६८)
**कथासंग्रह :** कृष्णाची करंगळी (१९६२), तुपाचा नंदादीप (१९६६), चंदनी उदबत्ती (१९६७).
**कादंबरी :** आकाशाची फळे (१९६०)
**नाट्यपदे :** भूमिकन्या सीता
**आत्मचरित्रपर लेखन :** मंतरलेले दिवस (१९६२), अजून गदिमा, वाटेवरल्या सावल्या (१९८१)

# नॉ लिंग : एका दुर्मीळ भाषेचा मागोवा

प्रसाद फाटक

**पा**वसाळ्यातला एक रविवार. कोकणाला यथेच्छ झोडपून झाल्यावर पावसाने किंचितशी उसंत घेतली असली तरी दिवस तसा भिजलेलाच. अशा वातावरणात बाहेर पडण्याचा आनंद वेगळाच. मस्तपैकी एखाद्या किल्ल्यावर जावं... ढगांनी पांगून परवानगी दिली तर उंचावरून आसमंत न्याहाळावा... त्यातून तो किल्ला एखादा सागरी किल्ला असला तर मग दुधात साखरच! अशा वातावरणात कोरलईच्या किल्ल्यावर जायला किती मजा येईल! तिथल्या तटबंदीला टेकून समुद्रावरचं बेफाम वारं श्वासांत भरून घेतलं की थकवा, नैराश्य, चिंता कुठल्या कुठे पळून जातात. यापूर्वी काही वेळा या किल्ल्यावर जायचा योग आला होता, पण पावसाळ्यात – अर्थात पावसाने थोडीशी उघडीप घेतल्यावरच – जायचा योग कधीच आला नव्हता. इतर ऋतूंत इथे एवढं प्रसन्न वाटतं तर पावसाळ्यात काय बहार येत असेल असा विचार बरेचदा डोक्यात यायचा. आज खरंतर खूप चांगली संधी होती तिथल्या जादुई वातावरणाचा अनुभव घ्यायची. कोरलई गावाकडेच तर मी निघालो होतो. पण आज माझं लक्ष कोरलईचा किल्ला हे नव्हतं, तर कोरलई गाव आणि त्यातही विशेषकरून तिथली एक विशिष्ट वस्ती या गोष्टींवर मी लक्ष केंद्रित केलं होतं. कोरलईच्या किल्ल्याला यापूर्वी दिलेल्या भेटींमध्ये दिसलेल्या शिलालेखांनी मला इथल्या भागातल्या पोर्तुगीज पाऊलखुणांचा मागोवा घ्यायला प्रवृत्त केलं होतं आणि त्यातूनच काही अनोख्या गोष्टी समोर येत गेल्या होत्या. त्या अभ्यासाचा प्रत्यक्ष पडताळा घ्यायचा तर कोरलईला आणि त्यातही एका विशिष्ट वस्तीला भेट देणं आवश्यक होतं. म्हणूनच मी कोरलईच्या दिशेने निघालो होतो. कोरलई हे अलिबागपासून २२ किलोमीटरवर असणाऱ्या रेवदंड्याच्या खाडीच्या पलीकडे असणारं छोटंसं गाव. रेवदंड्याच्या खाडीत घुसलेल्या भूभागावर वसलेलं. वरवर पाहता कोकण किनारपट्टीवर वसलेल्या कुठल्याही छोट्या गावांसारख्याच खाणाखुणा अंगावर वागवणारं. शेती आणि मासेमारी हा इथलाही मुख्य व्यवसाय. पण इथली एक गोष्ट विशेष आहे आणि ती एकमेवाद्वितीय आहे. ती म्हणजे इथे बोलली जाणारी एक भाषा. ही भाषा या गावाव्यतिरिक्त जगात इतरत्र कुठेही बोलली जात नाही. ही भाषा इथे कधी आणि कशी आली हे जाणून घ्यायचं तर इतिहासात डोकवायला हवं.

## कोरलईचा इतिहास

१४९८ साली वास्को-दि-गामाच्या रूपाने पोर्तुगीजांची पावलं भारतीय भूमीवर उमटली. केरळच्या कालिकत बंदरापाठोपाठ गोवा, दीव-दमण तसेच वसई या ठिकाणी

पोर्तुगीजांनी आपले वर्चस्व निर्माण केले आणि हे भाग हळूहळू ताब्यात घेतले. स्वाभाविकपणे तिथे पोर्तुगीज चालीरीती, भाषा यांचा प्रभाव पडला. या तीन प्रमुख वसाहतींसोबतच चौल-रेवदंडा आणि कोरलई या भागावरही पोर्तुगीजांचं वर्चस्व होतं. १५०५ साली पोर्तुगीजांनी चौलमध्ये प्रवेश केला. चौल हे प्राचीन काळापासून बंदर म्हणून प्रसिद्ध होतं. त्यामुळे या भागामध्ये व्यापाराच्या निमित्ताने प्रवेश करणं त्यांना सोपं गेलं. त्यावेळी या भागामध्ये निजामाची सत्ता होती. निजामाकडून पोर्तुगीजांना चौलचा किल्ला बांधण्याची परवानगी मिळाली. स्वाभाविकपणे त्या भागात आणि कोरलई गावात पोर्तुगीजांचा वावर सुरू झाला. त्याचवेळी पोर्तुगीजांनी चौलच्या बाजूला असणाऱ्या रेवदंड्याच्या खाडीपलीकडच्या टेकडीवरही तटबंदी बांधायला सुरुवात करण्याचा प्रयत्न केल्यामुळे निजाम आणि पोर्तुगीज संघर्ष झाला आणि त्यानंतरच्या समझोत्यात कोरलईच्या टेकडीवर पोर्तुगीजांनी बांधकाम करू नये असं ठरलं. परंतु बुऱ्हान निजामाच्या मृत्यूनंतर त्याचा उत्तराधिकारी 'बुऱ्हान निजाम दुसरा' याने कोरलईच्या टेकडीवर किल्ला बांधला. परंतु साम्राज्यविस्ताराचे स्पष्ट मनसुबे असणाऱ्या पोर्तुगीजांनी जोरदार हल्ला चढवत कोरलईचा किल्ला ताब्यात घेतला (१५९४). आता खाडीतून चौलमध्ये शिरणाऱ्या जहाजांवर पलीकडच्या कोरलई टेकडीवरून नजर ठेवणं सोपं जाणार होतं. या सगळ्या घडामोडींदरम्यान पोर्तुगीजांची वस्ती या भागामध्ये होऊ लागली होती. स्थानिक मराठी लोकांशी स्वाभाविकपणे संपर्क येऊ लागला. पोर्तुगीज आणि स्थानिक मराठी जनता यांच्यामध्ये संवादाची गरज निर्माण होऊ लागली. त्याचबरोबर पोर्तुगीजांना त्यांनी जबरदस्तीने गुलाम बनवलेल्या भारतीय समाजातील गुलामांसोबतही संभाषणाची निकड निर्माण होतीच. त्यातूनच एका नव्या भाषेचा उगम झाला. तिला त्या भाषेत 'नॉ लिंग' (आमची भाषा) असं म्हटलं जातं. दीडशेहून अधिक वर्षं या भागात पोर्तुगीजांचे अस्तित्व असल्यामुळे नवी भाषा अधिक दृढ होत गेली यात आश्चर्य नाही. खरं आश्चर्य यात आहे, की मराठ्यांशी झालेल्या तहामुळे १७४० साली पोर्तुगीज सैन्य निघून येथून गेल्यानंतरही पुढची जवळपास पावणेतीनशे वर्षं ही भाषा तशीच टिकून राहिलेली आहे! या काळात या भाषेचा प्रसार गावाबाहेरच काय पण गावाच्या अन्य भागातल्या ख्रिश्चनेतर समाजातही झाला नाही. त्यामुळे अन्यत्र या भाषेची दखल घेतले जाण्याचं कारणही नव्हतं.

### 'कोरलई क्रिओल पोर्तुगीज'चा अभ्यास

कोरलईची ही विशिष्ट भाषा ही एक क्रिओल आहे. क्रिओलचा अर्थ दोन किंवा अधिक भाषांच्या मिश्रणातून विकसित झालेली स्वतंत्र भाषा. युरोपियन देशांमधून अन्य देशांमध्ये स्थापन झालेल्या वसाहतींमध्ये राज्यकर्ते झालेल्यांची भाषा आणि स्थानिकांची

भाषा यांच्या मिश्रणातून अशा क्रिओल्सची निर्मिती झाल्याचं दिसून येतं. उदा० मॉरिशसमध्ये फ्रेंच भाषेवर आधारित 'मॉरिशियन क्रिओल' किंवा जमैकामध्ये इंग्रजीवर आधारलेली 'जमैकन क्रिओल' निर्माण झाली. भाषाशास्त्राच्या परिभाषेमध्ये कोरलईच्या भाषेला 'कोरलई क्रिओल पोर्तुगीज' म्हणतात. सोयीसाठी आपण तिला 'कोरलई क्रिओल' म्हणू.

कोरलईच्या या विशिष्ट भाषेचा उल्लेख The Manglore Magazineच्या २५ मे १९०२च्या अंकात आढळतो. त्याशिवाय जर्मन पुरातत्त्वशास्त्रज्ञ Gritli von Mitterwallnerलिखित चौलवरच्या संशोधनपर ग्रंथामध्येही (१९६४) या भाषेचा उल्लेख आढळतो. परंतु या भाषेकडे जगाचं लक्ष जायला १९८३ साली लिस्बन येथे भरलेली 'पोर्तुगीज भाषेची जगभरातील सद्यस्थिती' या विषयावरची परिषद कारणीभूत ठरली. मूळचे कोरलई गावचे असणारे आणि Mitterwallner यांना चौलविषयक संशोधनात साहाय्य करणारे जेरोम रोझारिओ यांनी या परिषदेमध्ये कोरलई क्रिओल भाषेमधली लोककथा सांगितली. या भाषेला स्वतःची लिपी नसल्यामुळे त्यांनी या भाषेतल्या कथा देवनागरी लिपीमध्ये लिहिल्या. रोमन लिपीमध्येही काही गोष्टी लिहिल्या गेल्या परंतु या भाषेतून देवनागरीत केले गेलेले लिखाण मूळ उच्चारांच्या अधिक जवळ जाते.

त्यानंतर १९८८पासून अमेरिकेतल्या इंडियाना विद्यापीठातील प्राध्यापक जे० क्लॅन्सी क्लेमेंत्स यांनी या भाषेचा जो अभ्यास केला आहे तो एखाद्या दीपस्तंभासारखा आहे. कोरलई गावात येऊन ते राहिले. त्यांनी ही भाषा बोलणाऱ्या भारतीय-पोर्तुगीज मिश्रसंस्कृतीचा अभ्यास केला, ती भाषा ते शिकले, या अभ्यासातून भाषेच्या निर्मितीचे विवेचन करणारा शोधनिबंध सादर केला. हा शोधनिबंध या भाषेची निर्मिती होण्याला आणि पोर्तुगीज सैन्य कोरलईमधून निघून गेल्यावरही ही भाषा इथे टिकून राहण्याला कारणीभूत असणाऱ्या गुंतागुंतीच्या सामाजिक आणि तसंच वैशिष्ट्यपूर्ण भौगोलिक परिस्थितीवरही प्रकाश टाकतो. हा शोधनिबंध इंटरनेटवर उपलब्ध असून या लेखाच्या शेवटी त्यांची लिंक देखील दिलेली आहे. क्लेमेंत्स फक्त भाषानिर्मितीच्या अभ्यासावरच थांबले नाहीत तर या भाषेचा शब्दसंग्रह, तिचं व्याकरण, वाक्यरचना, उच्चार, त्यातल्या पोर्तुगीज आणि मराठी या भाषांच्या सहभागाचे पृथक्करण असा विस्तृत अभ्यास करून त्यांनी त्यावर प्रबंध लिहिला. तो The Genesis of a Language: The formation and development of Korlai Portuguese या नावाने तो प्रकाशित झाला असून googleboooks.comवर अंशतः उपलब्धही आहे. आज या भाषेचा अभ्यास करणाऱ्यांसाठी क्लेमेंत्स यांचा शोधनिबंध आणि पुस्तक पथदर्शी आहे.

**'कोरलई क्रिओल'च्या निर्मितीमागची सामाजिक कारणं**

वर उल्लेखलेल्या 'गुलामांसोबतच्या संवादा'च्या मुद्द्याला असलेले बरेच गुंतागुंतीचे कंगोरे जे० क्लॅन्सी क्लेमेंत्स यांनी उलगडून सांगितले आहेत. पोर्तुगीज भारतात येण्याच्या काळात पोर्तुगालमध्ये आफ्रिकेतून आणलेल्या गुलामांचा वापर ही अतिशय सर्वमान्य गोष्ट होती. सर्रास होणारा गुलामांचा व्यापार आणि वापर अंगवळणी पडलेली असल्यामुळे ज्या ठिकाणी सत्ता ताब्यात घेतली आहे, अशा ठिकाणच्या स्थानिकांचा गुलाम म्हणून वापर करणे हे पोर्तुगीजांसाठी स्वाभाविकच म्हणावे लागेल. त्यांनी कोरलई भागातही स्थानिक उपेक्षित लोकांना गुलाम म्हणून वापरून घेण्यास सुरुवात केली. यातली बहुतांश मंडळी तत्कालीन भारतीय समाजातल्या जातिव्यवस्थेतच्या सर्वात खालच्या स्तरातील होती. दरवर्षी पोर्तुगालमधून येणाऱ्या मंडळींमध्ये स्त्रिया अगदी हाताच्या बोटावर मोजण्याइतक्या होत्या. हातात अधिकार आणि पाठीशी सत्तेचे बळ असलेल्या पोर्तुगीज सैनिकांची नजर भारतामध्ये गुलाम बनवलेल्या स्त्रियांवर जात असे. लग्न न झालेले पोर्तुगीज सैनिक (ज्यांना सोल्डॅडोज म्हटले जाई) आपल्यासोबत अनेक गुलाम स्त्रिया बाळगत आणि त्यांच्याशी त्या सैनिकांचा शरीरसंबंध येत असे. यापैकी एखाद्या सैनिकाने स्थानिक भारतीय स्त्रीसोबत लग्न करून इथेच स्थायिक व्हायचे ठरवले तर पोर्तुगीजांकडून त्यांना सैन्यातून पदमुक्त होऊन इथेच राहण्याची मुभा होती. काही सैनिक याचा अवलंब करून भारतीय स्त्रियांसोबत राहून किंवा त्यांच्याशी लग्न करून इथे स्थायिक झाले (अशांना कॅसॅडोज म्हटले जात असे). त्यांच्या पदरीदेखील स्त्री आणि पुरुष दोन्ही प्रकारचे गुलाम असत. सोल्डॅडोज आणि कॅसॅडोज यांच्या भारतीय गुलाम स्त्रियांसोबत येणाऱ्या संबंधांतून युरोपियन-भारतीय अशा मिश्र वर्णाची संतती निर्माण होऊ लागली. राजकीय आक्रमणाइतकाच धार्मिक आक्रमणावर भर देणाऱ्या पोर्तुगीजांकडून गुलाम स्त्री-पुरुष तसेच अन्य स्थानिकांचेही बऱ्यावाईट मार्गांनी मोठ्या प्रमाणावर धर्मांतर केले गेले, युरोपियन-भारतीय अशा मिश्र वर्णाची अनौरस संतती यांनाही बाप्तिस्मा देण्यात येऊ लागला. इथल्या जातिव्यवस्थांच्या चौकटीत नव्या ख्रिस्ती धर्मांतरितांचा एक नवा समाजघटक समाविष्ट होऊ लागला होऊ लागला होता. कुठल्याही जातीतला माणूस जर हिंदूधर्मातून परधर्मात गेला तर त्याचा हिंदू धर्मातील स्वजातीतील मंडळीही त्याच्याशी संपर्क ठेवणं बंद करत. धर्मांतरित झालेल्या निम्न जातीतील समाजापुढे दुहेरी पेच उभा राहिला. मुळामध्ये जातीच्या आधारावर त्यांना वेगळे ठेवण्यात आले होतेच. परंतु धार्मिक बाबतीतही ते वेगळे गणले जाऊ लागल्याने स्वतःच्या जातीतील हिंदू आप्तदेखील त्यांना पारखे झाले. असा समाजगट आणखी छोट्या कप्प्यामध्ये जगू लागला. ख्रिश्चन झाल्याने पोर्तुगीजांशी आणि पोर्तुगीज भाषेशी त्यांचा हिंदूंपेक्षा अधिक





अनुक्रमणिका

संबंध येऊ लागला असला तरीही शुद्ध पोर्तुगीज भाषेशी त्यांचा संपर्क जास्त येऊ शकला नाही. याला पोर्तुगीजांमधल्या सामाजिक स्तरांचाही यामध्ये वाटा होता. भारतात आलेल्या पोर्तुगीज ख्रिश्चनांमध्ये आई-वडील दोघेही युरोपियन, वडील युरोपियन व आई युरेशियन, वडील युरोपियन व आई भारतीय इत्यादी अनेक पातळ्यांवरचे भेद होते. पोर्तुगीज पुरुष आणि त्याची स्थानिक भारतीय बायको/जोडीदारीण असाही एक स्तर निर्माण झाला. भारताच्या विशिष्ट जातीतून धर्मांतरित करून ख्रिश्चन केलेल्या लोकांच्या जातींवरून आणखी पोर्तुगीज ख्रिश्चनांमध्येही एक मोठी जातिव्यवस्था निर्माण झाली होती. सोबतच्या तक्त्यावरून तिच्या स्वरूपाची कल्पना येईल. (इथे हे लक्षात घ्यायला हवं की त्यातही युरोपियन पोर्तुगीज ख्रिश्चन स्वतःला उच्च समजत. एवढंच नाही तर त्यावेळचा पोर्तुगीज गव्हर्नर अल्फोन्सो-द-अल्बुकर्कने घालून दिलेल्या अटीनुसार भारतातील पोर्तुगीजांनी भारतीय स्त्रियांशी संबंध ठेवायचे असल्यास ते कायदेशीर (लग्न करून ठेवलेले) असण्याची अपेक्षा असे. जातिव्यवस्थेला नावं ठेवणाऱ्या किंवा त्यातल्या भेदांचा फायदा उठवून धर्मांतर करणाऱ्या या तथाकथित पुढारलेल्या समाजातही उच्चनीचतेच्या कल्पना प्रबळ होत्याच. अर्थात असा आग्रह असला तरी प्रत्यक्षात पोर्तुगीजांचे स्थानिक उच्च जातीतील स्त्रियांशी लग्न करण्याचे प्रयत्न यशस्वी होऊ शकले नाहीत. अशा वेळेस निम्न समजल्या जाणाऱ्या जातीतील स्त्रियांना गुलाम करून प्राप्त करणे तुलनेने सोपे होते).

सर्वसाधारणपणे एखाद्या ठिकाणी आलेले परकीय आणि स्थानिक यांच्यामध्ये जो भाषिक व्यवहार होतो, तो एखाद्या कामचलाऊ भाषेच्या माध्यमातून होतो, आणि त्यामध्ये मुख्यत्वेकरून दोन्ही भाषांमधले काही सोयीचे शब्द समाविष्ट असतात. या संपर्काच्या माध्यमाला पूर्णपणे विकसित भाषा समजता येत नसले तरीही ती एक प्रकारची बोली असते. पोर्तुगीज आणि स्थानिक स्त्रिया हे एकाच कुटुंबात समाविष्ट झाल्यामुळे याठिकाणी व्यवहारापुरती भाषा न राहता ती कुटुंबव्यवहारातली भाषा म्हणून आकाराला येऊ लागली. ही भाषा पोर्तुगीज सैनिक आणि भारतीय गुलाम स्त्री यांच्यापासून निर्माण झालेल्या संततीची मातृभाषा बनली आणि स्वाभाविकपणे ती त्या समाजामध्ये अधिक अधिक प्रमाणात पसरली आणि त्याला एक निश्चित स्वरूप प्राप्त झालं. मुळात या भाषेतला पोर्तुगीज भाषेचा वाटा हा तिच्या संपूर्ण शुद्ध स्वरूपातला नाही. कारण ज्या सामाजिक स्तरामध्ये ही भाषा विकसित झाली त्यांचा संपर्क मुख्यत्वे सोल्डॅडोज बोलत असलेल्या पोर्तुगीज भाषेच्या काहीशा भेसळयुक्त आवृत्तीशीच आला होता (सोल्डॅडोजची भाषा अशी भेसळयुक्त पोर्तुगीज असण्याची कारणं दोन : (१) त्यांचा भारतात येण्याआधी अन्य ठिकाणी आलेल्या बिगरपोर्तुगीज भाषेशी संबंध आणि (२) पोर्तुगालमध्ये असतानाची त्यांची निम्न

सामाजिक स्तराची पार्श्वभूमी). बंदिस्त जातिव्यवस्थेमुळे भारतातील नवख्रिश्चनांचा आपल्यापेक्षा वरच्या स्तरावरील – म्हणजे एका अर्थाने पोर्तुगीज अभिजनांच्या – शुद्ध पोर्तुगीज भाषेशी संपर्क येऊ शकला नाही आणि त्यातच आपल्या मूळच्या मराठी भाषेतील शब्दांची रूपंही समाविष्ट झाली. त्यातूनच या भाषेला प्रमाण मराठी आणि प्रमाण पोर्तुगीज या दोन्ही भाषांपेक्षा वेगळं स्वरूप प्राप्त झालं. आता प्रश्न असा पडू शकतो की ही भाषा कोरलईची क्रिओल कोरलईबाहेर कशी गेली नाही? यासाठी कोरलईचं भौगोलिक स्थान लक्षात घ्यायला हवं. आधी म्हटल्याप्रमाणे खाडीमध्ये घुसलेल्या एका चिंचोळ्या जमिनीच्या पट्ट्यावरती हे गाव वसलेलं आहे. त्याच्या आजूबाजूला किंवा सीमेला लागून एकही गाव नाही तसंच बाजूला असलेल्या रेवदंड्याच्या खाडीमुळे कोरलाईचा थेट जमिनीवरून संपर्क हा रेवदंड्याशीसुद्धा नव्हता. त्यामुळे कोरलईबाहेर ही भाषा जाऊ शकली नाही. बाहेरच कशाला, परंतु जाती-धर्माच्या कुंपणात अडकल्यामुळे कोरलईच्या अन्य समाजामध्येदेखील ही भाषा जाऊ शकली नाही. त्यामुळेच आज भारतातल्याच नव्हे तर जगातल्या दुर्मीळ होत असलेल्या भाषांपैकी ही एक भाषा आहे.

**माझा कोरलईतला वाटाड्या**

या भाषेबद्दल इंटरनेटवर बरीच माहिती मिळू शकली असली तरी फक्त तेवढ्यावरच न थांबता खुद्द कोरलई गावांमधल्या ख्रिश्चन वस्तीला भेट द्यायच्या उद्देशाने मी कोरलईकडे निघालो होतो. कोरलईमध्ये प्रवेश केला तेव्हा दुपारचे दोन वाजून गेले होते. यापूर्वी जेव्हा दोन-तीनदा कोरलईला येऊन गेलो होतो तेव्हा डावीकडे एक कॉन्व्हेंट दिसलं होतं. इथे ख्रिश्चनधर्मीयांच्या या विशेष भाषेबद्दल इथे नक्की माहिती मिळेल म्हणून त्या कॉन्व्हेंटमध्ये शिरलो. परंतु तिथल्या सिस्टर तिथे नवीनच आलेल्या असल्याने त्यांना याबद्दल फारशी काही माहिती नव्हती. "तुम्ही इथे विचारण्यापेक्षा ग्रामपंचायतीच्या कार्यालयामध्ये जा, तिथे त्या लोकांना सगळी माहिती आहे. ते तुम्हाला व्यवस्थित माहिती देतील" असा सल्ला त्यांनी दिला म्हणून ग्रामपंचायतीकडे कूच केले. तिथल्या एकमेव कर्मचाऱ्याकडे या गावात बोलल्या जाणाऱ्या विशेष भाषेबद्दल चौकशी केली. त्याने एकदम प्रश्नार्थक चेहरा केला आणि म्हणाला "ती भाषा ख्रिश्चन बोलतात. ती आम्हांला येत नाही आणि त्या भाषेची आम्हांला काही माहितीही नाही." मी हैराण झालो आणि म्हणालो "तुम्हांला येत नाही ठीक आहे पण ते तुमच्याच गावातले नागरिक आहेत. ग्रामपंचायतीसारख्या महत्त्वाच्या ठिकाणी काही ना काही माहिती मिळेल असं वाटलं म्हणून मी इथे आलो". पण त्याने तेही उडवून लावले आणि म्हणाला, "आम्ही मराठी बोलतो... त्यांची भाषा त्यांना माहिती.. तुम्ही त्यांनाच भेटा.." खरं म्हणजे त्या भाषेबद्दल

चौकशी करायला गावात अलीकडे कुणी ना कुणी येत असतं आणि हे त्या गावातल्या लोकांनाही माहिती आहे. जे पर्यटक, भटके फक्त किल्ला पाहण्यासाठी गावात येतात त्यांना या एकमेवाद्वितीय भाषेबद्दल थोडक्यात माहिती व्हावी म्हणून गावात अथवा किल्ल्यावर काही माहितीफलक लावले तर ते किती चांगलं होईल! परंतु एका अत्यंत दुर्मीळ भाषेचा ठेवा आपल्या भाषेला लाभला आहे याचं कुठलंही सोयरसुतक इथल्या प्रशासकीय यंत्रणेला नाही. ही उदासीनता पाहून वाईट वाटलं.

आता काय करावे मला कळेना. बाजूला एक आखूड पंचा गुंडाळलेले आजोबा दिसले. त्यांचं नाव नारायण बलकवडे. ते तिथे कसल्याशा कामासाठी आलेले असावेत. ते आमचं बोलणं ऐकत होते. मला म्हणाले "ती भाषा कुठल्या भागातले लोक बोलतात हे मला माहिती आहे. पण त्याबद्दल तुम्ही चर्चच्या फादरकडेच चौकशी करायला हवी." मी चक्रावलो. म्हटलं, "आत्ता तिथून कॉन्व्हेंटमधूनच आलो. पण त्या सिस्टरनी असे कुणी फादर आहेत असं काहीच सांगितलं नाही". ते म्हणाले "तुम्हांला चर्चमध्ये जावे लागेल. तिथले फादर याबद्दल माहिती देऊ शकतात". मी विचारलं, "मला तुम्ही फादरकडे घेऊन जाता का?" तर ते कुरकुरायला लागले. "बघा आता माझं वय किती आहे, एवढं कसं चालू... ते चर्च माझ्या घराच्या विरुद्ध दिशेला आहे..." वगैरे वगैरे. मी त्यांना म्हटलं "काही काळजी करू नका. माझ्याकडे कार आहे. मी तुम्हाला कारमधून फादरकडे घेऊन जातो." "ठीक आहे, पण फादरशी गाठ घालून दिली की मला आधी घरी आणून सोड आणि मग त्यांच्याशी बोलत बस" असं ते म्हणाले. मी त्यासाठीही तयार झालो म्हटल्यावर ते माझ्यासोबत कारमध्ये बसले. आल्या वाटेने मी पुन्हा निघालो, एवढेच नाही तर गावाबाहेर पडलो आणि मुख्य रस्त्यावर आलो. त्या रस्त्याला लागल्यावर लगेचच डावीकडे चर्च पाहिलं. गावात शिरण्याआधी असणाऱ्या या चर्चकडे माझं दुर्लक्षच झालं होतं. चर्चपाशी पोचल्यावर आम्ही दोघे कारमधून उतरलो आणि चर्चच्या आवारात शिरलो. चर्चच्या शेजारीच  माउंट कार्मेल शाळाही आहे. खेळणारी दोनचार मुलं सोडली तर तिथे शांतता होती... त्यांना फादर कुठे असतात हे विचारून घेतलं. चर्चमागच्या बाजूने जिन्याने फादरच्या निवासस्थानाबाहेर जाऊन उभे राहिलो. आता प्रार्थनेची वेळ झालेली असल्यामुळे फादर येतील असं कळलं होतं. आम्ही बाहेरून खूपवेळ बेल/कडी वाजवूनही दरवाजा उघडला नाही. आत कुणी नसेल असे समजून मी परत निघायच्या विचारात होतो. पण बलकवडे आजोबांनी कडक आवाजात सांगितलं, "काम झाल्याशिवाय इथून हलायचं नाही." मला गंमत वाटली. बहुधा त्यांनाही माझ्या कामात रस निर्माण झाला होता. बरोबर पाच वाजता दरवाजा उघडला... म्हणजे फादर आतच होते तर! फादर म्हणल्यानंतर हिंदी

चित्रपट अनेक गोष्टी 'बढा चढा के' दाखवतात हे माहिती असलं तरी फादर म्हटलं की एक विशिष्ट प्रतिमाच आपल्या डोक्यात पक्की असते. त्यापेक्षा हे एकदमच वेगळे होते. वय फार दिसत नव्हतं. त्यांचा तो सुप्रसिद्ध पेहरावही नव्हता. साध्या शर्ट-पँटमध्ये होते. त्यांच्याकडे इथल्या भाषेबद्दल चौकशी केली. त्यांना चर्चमध्ये काम असल्यामुळे ते वेळ देऊ शकणार नव्हते, पण त्यांनी तिथून जाणाऱ्या एका शाळकरी मुलीला हाक मारली आणि आम्हांला एका गृहस्थांकडे घेऊन जायला तिला सांगितलं. मगाशी "मला आधी घरी सोड" म्हणणारे आजोबा आता माझ्यासोबतच चालू लागले होते. मला खरंच गंमत वाटत होती आणि बरंही वाटत होतं. अशावेळी स्थानिक कुणी सोबत असलं की बरं असतं...

**'नॉ लिंग' भाषकाशी गप्पाटप्पा**

चालत चालत आम्ही निघालो होतो. अरुंद गल्ल्या असणारी ती वस्ती होती. तिथल्या एका छोट्याशा चौकात एक मोठा क्रॉस उभा केलेला दिसला. घरातच थाटलेली एक-दोन दुकानं दिसली. घरांच्या दारांवर अथवा दुकानांमध्ये क्रॉस अथवा येशूची प्रतिमा हटकून दिसत होती. वस्तीतली माणसं आमच्याकडे काहीशा कुतूहलाने बघत होती. पुढे एका गल्लीत वळलो आणि एक दुकान असं दिसलं ज्यावर चक्क स्वस्तिकाची खूण होती! मला आश्चर्य वाटलं... संपूर्ण ख्रिश्चन वस्तीत हे एक दुकान वेगळं उठून दिसत होतं. त्याच्यापुढची काही घरं ओलांडली आणि आमच्यासोबतची मुलगी थांबली. हाक मारून तिने घरातल्या गृहस्थांना बोलावलं आणि एका अगम्य भाषेत त्यांच्याशी बोलली. "फादरने यांना तुमच्याकडे पाठवलं आहे" असं काहीतरी बोलली असावी. मीही पुढे होऊन त्यांना माझा तिथे येण्याचा उद्देश सांगितला. त्यांनी हसतमुखाने आम्हांला आत यायला सांगितलं. मी आणि आजोबा दोघेही आत गेलो. दारावर 'Ignatius Pereira' अशी पाटी होती. आमच्या गप्पा सुरू झाल्या. परेरा अगदी मनमोकळेपणाने बोलत होते. त्यांच्याकडून आणखी तपशील कळत गेले. ते इथेच जन्मले-वाढले. शिक्षण माउंट कार्मेल शाळेच्या मराठी माध्यमातूनच झालेलं असल्याने ते अस्खलित मराठी बोलतात. १९६४ सालापासून इथल्या चर्चमधला 'मास'सुद्धा मराठीत होतो. घरामध्ये मात्र ते कोरलई क्रिओल भाषाच बोलतात. चर्चचे फादरही मूळचे इथले नसल्याने त्यांनाही कोरलई क्रिओल भाषा समजत नाही. सुमारे पाचशे वर्षं या भाषेत व्यवहार होत असले तरी असली तरी या भाषेला स्वतःची लिपी नाही. जे० क्लॅन्सी क्लेमेंत्स यांनी आणखी एक अत्यंत महत्वाचं काम करून ठेवलं आहे. या भाषेतल्या परंपरागत चालत आलेल्या लोककथा एका पुस्तकात संकलित केल्या आणि त्यासाठी यासाठी देवनागरी लिपी वापरली. हा एक अतिशय महत्त्वाचा (आणि कदाचित या भाषेतला एकमेव) लिखित दस्तऐवज आहे. यामुळे भाषा फक्त मौखिक न

राहता छोट्याशा प्रमाणात का होईना लिखित स्वरूपात देखील आली आणि लोकांच्या अभ्यासासाठी उपलब्ध झाली. 'नॉ लिंग सू इस्तॉर' (आपल्या भाषेतल्या गोष्टी) असं या पुस्तकाचं नाव आहे. स्थानिक तसंच पोर्तुगीज संस्कृतीचेही काही संदर्भ या कथांमध्ये विखुरलेले आहेत. परेरा यांनी आपल्याकडचं ते पुस्तकही मला दाखवलं. मी उत्सुकतेपोटी पुस्तकामधलं काहीतरी वाचून दाखवून त्याचा अर्थ सांगण्याची त्यांना विनंती केली. त्यांनी उदाहरण म्हणून पुस्तकाच्या अनुक्रमणिकेमधली काही शीर्षकं वाचली आणि प्रत्येक शीर्षकाचा मराठीमध्ये अर्थ सांगितला. मी तो रेकॉर्डही करून घेतला.

पुस्तकाच्या प्रस्तावनेत कोरलईच्या ख्रिश्चन समाजाचा संक्षिप्त इतिहास लिहिलेला आहे, त्यात कोरलई, चौलचे किल्ले मराठ्यांच्या ताब्यात आल्यावर ख्रिश्चन मंडळींना रेवदंड्याहून इथे (जिथल्या ख्रिश्चन वस्तीतल्या घरात मी परेरा यांच्याशी बोलत होतो) डोंगरापाशी पिटाळलं गेल्याचंही म्हटलं आहे (आता नीट लक्षात येत नसलं तरी पूर्वी इथे डोंगरउताराचा भाग होता. कोरलईच्या किल्ल्याच्या टेकडीच्या दक्षिणेला असलेल्या या डोंगराचा १८८३च्या कुलाबा जिल्ह्याच्या गॅझेटियटरमध्येही उल्लेख आहे). हा डोंगरउतार आणि कोरलईचा किल्ला असणारी टेकडी (जिला पोर्तुगीज 'मोरो' असं संबोधत असत) यांच्या दरम्यान कोरलई गाव पसरलेलं आहे. इथलं माउंट कार्मेल चर्च १७४१मध्ये बांधलं गेल्याचा गॅझेटियटरमध्ये उल्लेख आहे. चर्चच्या डागडुजी आणि रंगरंगोटीमुळे एवढ्या प्राचीन वास्तूच्या आवारात आपण फिरत आहोत याची मगाशी जाणीव झाली नव्हती.

"ही भाषा बोलणारी किती कुटुंब असतील?" मी विचारलं.

"पोर्तुगालला न जाता इथेच स्थायिक झालेल्या पोर्तुगीजांची या गावात सात प्रमुख घराणी आहेत : रोजारिओ, डिसूजा, परेरा, मार्तीस, रॉड्रिग, वेगास, रोचा, पेना आणि गोम्स. कालांतराने कारवार, गोवा आणि दीव-दमणमधूनही काही कुटुंबं इथे स्थायिक झाली. ही सर्व मिळून सुमारे २३० ख्रिश्चन घरांमधली सुमारे हजारेक माणसं ही भाषा बोलतात" असं परेरा यांनी सांगितलं (क्लेमेंत्स यांना कोरलई क्रिओलमध्ये काही मल्याळी शब्ददेखील आढळल्याने त्यांनी 'इथे कालिकतच्या पोर्तुगीज वसाहतीतून काही जण आलेले असण्याचीही शक्यता आहे' असं नमूद केलं आहे.)

जगाच्या ७.२ अब्ज लोकसंख्येपैकी फक्त हजार माणसं म्हणजे ०.००१३८८८८८% इतका छोटासा समूह कोरलई क्रिओल भाषा बोलतो यावरून ही भाषा किती दुर्मीळ आहे याची आपल्याला कल्पना यावी. या संदर्भात पुढे अधिक अभ्यास करताना मला https://www.ethnologue.com/cloud/vkp या दुव्यावर एक आलेख बघायला मिळाला. किती लोकांची ही 'प्रथम भाषा' आहे ('य' अक्ष) आणि ही भाषा किती





अनुक्रमणिका

संकटग्रस्त (Endangered) ('क्ष' अक्ष) आहे यानुसार त्या त्या भाषेचं स्थान बघता येतं. कोरलई क्रिओल भाषा ही या आलेखात कुठे येते, तेही या आलेखामध्ये बघता येईल. त्यानुसार सध्या ही भाषा एका पिढीकडून पुढच्या पिढीकडे संक्रमित होते आहे आणि तिला नजीकच्या भविष्यात धोका नाही. परंतु अन्य भाषांचा वाढता प्रभाव (मराठी/हिंदी/इंग्रजी) आणि त्या प्रमाणात ही भाषा बोलणारी लोकसंख्या न वाढणे, तसंच विविध कारणांनी कोरलईमधून बाहेर स्थलांतरित होणारा कोरलई क्रिओल भाषक समाज या गोष्टी या भाषेला हळूहळू पण निश्चितपणे प्रभावित करत आहेत. पुढच्या पायरीवर गेल्यावर ही भाषा अधिकाधिक संकटग्रस्त असल्याचं दर्शवत असल्याने कोरलई क्रिओल संकटग्रस्ततेच्या एक पायरी खाली आहे असं म्हणू शकतो.

परेरा यांना "या भाषेच्या जतनासाठी सरकारदरबारी काही प्रयत्न होतो का?" असा प्रश्न विचारल्यावर तसे प्रयत्न त्यांच्या दृष्टीस पडले नसल्याचं सांगितलं. काही अभ्यासक मात्र आवर्जून या भाषेचा अभ्यास करत असल्याचं ते म्हणाले. भाषेबद्दल जाणून घेण्यासाठी या गावाला भेट देणाऱ्या मंडळींची संख्या वाढत आहे. ती पुरेशी आहे की नाही हे आपण सांगू शकत नाही, परंतु या भाषेच्या अस्तित्वाची जाणीव आहे याची कल्पना असणं हेही नसे थोडके. दोन-चार दिवसांपूर्वीच गावात युरोपातील विविध देशांतल्या मंडळींचा एक ग्रुप गावात आला होता. कोरलई क्रिओल इतकंच या गावातलं हिंदू-मुस्लिम-ख्रिश्चन यांच्यातलं सामंजस्य हाही त्यांच्या कुतूहलाचा विषय होता. काही दिवसांपूर्वीच परेरा यांच्याकडे पुण्याच्या डेक्कन कॉलेजमधून काही विद्यार्थिनी आणि एक पत्रकार येऊन या भाषेचे बरेच तपशील जाणून घेऊन गेले होते. त्यांचा यावर पुस्तक काढण्याचाही मानस आहे, हे ऐकून याबद्दल अधिक काही ठोस गोष्ट घडत असल्याबद्दल बरं वाटलं. आमच्या गप्पा चालू असताना या सगळ्या संवादांमध्ये बलकवडे आजोबासुद्धा उत्साहाने भाग घेत होते. ते आणि परेरा यांची एकमेकांशी ओळख नसली तरी एकाच गावात राहत असल्याने काहीतरी सामायिक ओळख निघालीच आणि बोलणं आणखीनच अनौपचारिक होऊन गेलं.

इग्नेशिअस परेरा यांच्याशी बोलून झाल्यावर या भेटीची आठवण म्हणून ते आणि बलकवडे आजोबा यांच्यासोबत एक फोटो काढला. परेरा यांना obrigada ('धन्यवाद' या अर्थाचा 'कोरलई क्रिओलमधला शब्द) म्हणून बाहेर पडलो. मी बलकवडे आजोबांना म्हणालो "माझ्यामुळे तुमचा बराच वेळ गेला. तुमच्या घरचे तुमची वाट बघत असतील" तर ते म्हणाले "घरच्यांना काही वाटणार नाही. मी कोणाकडे तरी गेलो असेन असं समजतील... तुझं काम झालं हे महत्त्वाचं." मला खूप छान वाटलं. त्यांनी मला फक्त कोणाला भेटायचं एवढंच दाखवलं नाही, तर क्रिओल भाषेचा अभ्यास करण्याची माझी

इच्छा आहे हे पाहून माझ्या कामातही रस घेतला होता. खुद्द त्यांचा मुलगा 'माउंट कार्मेल' शाळेमध्ये शिक्षक आहे. त्यामुळे आजोबांचा या भाषेशी प्रत्यक्ष संबंध आलेला नसला तरीही त्यांना या भाषेच्या अस्तित्वाबद्दल कल्पना आहे.

**'नॉ लिंग' बोलणारा बिगरख्रिश्चन!**

मी आणि बलकवडे आजोबा बोलता बोलता पुन्हा एकदा माउंट कार्मेल चर्चच्या आवारात आलो होतो. तिथे आजोबांचे एक ओळखीचे ख्रिश्चन गृहस्थ भेटले. आजोबांनी त्यांना मी इथे कशासाठी आलोय हे सांगितल्यावर ते म्हणाले "बराच काळ बाकीच्या समाजातले (ख्रिश्चनेतर) लोक आमच्या फारसे संपर्कात आले नाहीत. जे आले त्यांना कुणालाही आमच्या भाषेबद्दल उत्सुकता वाटली नाही. फक्त त्या दुकानातला मारवाडी माणूस भाषा शिकला." मी हे ऐकून उडालोच.

"कुठला मारवाडी? त्याला ही भाषा येते?"

"आतमध्ये गल्लीत एक दुकान आहे त्या दुकानाचा मालक मारवाडी आहे, त्याला ही भाषा येते." बलकवडे आजोबांना मी म्हणालो, "अजून थोडासा वेळ थांबता का? मी त्या दुकानात जाऊन येतो" ते आनंदाने तयार झाले. मी घाईघाईने गल्लीत गेलो. मगाशी स्वस्तिक चितारलेलं दुकान पाहून जो प्रश्न पडला होता त्याचं उत्तर मिळालं होतं. मी त्या दुकानात जाऊन त्याच्या तरुण मालकाशी गप्पा मारल्या. त्याचं नाव राकेश गांधी. "या भाषेची माहिती घेत असताना मला ती इथल्या ख्रिश्चनांव्यतिरिक्त कुणाला येत नाही असं कळलं होतं. मग तुम्हाला ही भाषा कशी काय येते?" त्यावर तो म्हणाला "माझा जन्म इथलाच. माझं शिक्षणही इथल्याच माउंट कार्मेल शाळेमध्ये झालं. मी इथल्याच मुलांमध्ये राहिलो, वाढलो. त्यामुळे स्वाभाविकच मला आणि माझ्या सहा बहीणभावांना ही भाषा येते. माझ्या आईवडिलांनाही यायची, पण ते आता हयात नाहीत." त्याचे बहीणभाऊ लग्न झाल्यामुळे किंवा कामानिमित्त इतरत्र स्थायिक झाले. त्यांचा आता या भाषेशी संपर्क, संबंध कमी कमी होत जाणार. राकेश स्वतःदेखील आता बायकामुलांसोबत घेऊन खाडीपलीकडच्या रेवदंड्यात राहतो, फक्त आपलं छोटंसं दुकान चालवायला तो दिवसभर इथे असतो म्हणून फक्त त्याचा या भाषेशी रोजचा संबंध येत असतो. हे सगळं ऐकत असताना माझ्या डोक्यात एका विलक्षण शक्यतेबद्दल विचारचक्र सुरू झालं होतं. मुळात कोरलई क्रिओल भाषा बोलणारी माणसं जगभरात फक्त हजारच्या आसपास. तीही फक्त कोरलईच्या ख्रिश्चन समाजातली. त्याशिवाय मूळची त्या समाजातली नसलेली पण ती भाषा (मातृभाषा नसूनही) अस्खलितपणे जाणणारी माणसं जगात कदाचित फक्त ७-८ (तीही या एकाच गांधी कुटुंबातली), त्यातही त्या भाषेतून दैनंदिन व्यवहार करणारा तो

एकमेव ख्रिश्चनेतर.... त्या अर्थाने मी जगातल्या एकमेवाद्वितीय व्यक्तीशी बोलत असण्याच्या शक्यतेने थरारलो. कोण कुठल्या मारवाड प्रांतातून बाहेर पडून सर्वार्थाने अपरिचित प्रांतात जाऊन, तिथली भाषा शिकून, तिथे आपले पाय घट्ट रोवून धंदा कसा करावा हे मारवाडी लोकांकडून शिकावं. या समाजातल्या दोन पिढ्यांअगोदरच्या एका माणसाने कोरलईसारख्या बाजूला पडलेल्या गावात येऊन धंदा केला आणि त्यातून निर्माण झालेल्या एका शक्यतेशी मला संवाद साधता आला. मळलेली वाट सोडून थोडं आडवाटेला गेलं की काळाचे, शक्यतांचे धागे कसे जुळू शकतात याची घराबाहेर पडताना आपल्याला कल्पनाही नसते. फक्त गरज असते ती डोळे उघडे आणि कुतूहल जागे ठेवून फिरण्याची.

डोक्यात चक्र चालू असतानाच मी पुन्हा चर्चकडे निघालो होतो. येताना समोरून एक एकदम गोऱ्या, तुकतुकीत कांतीच्या आणि राखाडी डोळ्यांच्या, स्थानिक पद्धतीची साडी नेसलेल्या आज्जी येताना दिसल्या. गळ्यात क्रॉस होता. त्यांच्या डोळ्यांकडे मी पाहतच राहिलो. मग मला जाणवलं, की सकाळी ग्रामपंचायतीत पाहिलेल्या एका मुलीपासून ते या वस्तीतली माणसं आणि अगदी या आज्जींपर्यंत अनेकांचे डोळे वेगळे होते. सर्वसाधारणपणे कोळीवाड्यांमध्ये आढळून येणार नाहीत अशा डोळ्यांच्या रंगाशी ते नातं सांगत होते. शिवाय काहींची तुकतुकीत त्वचाही त्यांच्या एकेकाळच्या गोरेपणाची आठवण करून देत होती. सुमारे पाचशे वर्षांपूर्वी या भूमीवर पाय ठेवलेल्या त्यांच्या पूर्वजांच्या खाणाखुणा काळाच्या ओघामध्ये पुसट झालेल्या असल्या तरी नष्ट झाल्या नव्हत्या.

**निरोप**

चर्चपाशी पोचलो तेव्हा बलकवडे आजोबा वाट पाहात उभे होते. त्यांनी मला जेवढी मदत केली त्याबद्दल त्यांचे आभार मानावे तितके कमीच होते. त्यांना कारमध्ये बसवलं आणि समुद्रकिनाऱ्याजवळच्या त्यांच्या घरी नेऊन सोडलं. त्यांच्या मुलाशी गप्पा मारता आल्या. तो स्वतः माउंट कार्मेल विद्यालयामध्ये शिकवत असल्यामुळे या समाजातल्या मुलांचा त्याच्याशी चांगला परिचय आहे. शिक्षणाचं माध्यम मराठी असलं तरी ती मुलं वर्गात आपापसात बोलताना, एवढंच नाही तर भांडतानादेखील आपली मातृभाषा अर्थात 'कोरलई क्रिओल'च वापरतात. "एकाने दुसऱ्याला शिव्या घातल्या तरी सुद्धा ते मला कळत नाही. शेवटी मी त्यांना म्हणतो, ज्या काही शिव्या घालायच्या आहेत त्या मराठीत घाला, म्हणजे मला कळेल तरी..." असं तो म्हणाला आणि मला हसू आवरलं नाही. एखाद्या भाषेचं वेगवेगळ्या माणसांशी कसं वेगवेगळं नातं असू शकतं याचा एक गमतीशीर दाखला मला मिळाला. भाषेच्या अस्तित्वाचा आणखी एक पैलू कळला...





अनुक्रमणिका

बलकवडे कुटुंबाचे मनापासून आभार मानून मी निघालो. समोर कोरलईचा किल्ला होता. सूर्य समुद्रात नुकताच लुप्त झाला होता. कुंद पावसाळी हवेत किल्ल्यावरचा सुसाट वारा अंगावर घेण्याची इच्छा आज अपूर्णच राहणार होती. पण त्या वाऱ्याइतक्याच भन्नाट गोष्टी आज मला अनुभवता आल्या होत्या. त्या किल्ल्यावरच्या पोर्तुगीज भाषेतल्या शिलालेखांनी जागं केलेलं कुतूहल आज मला अगदी वेगळ्या उद्देशाने कोरलईला घेऊन आलं होतं. त्या कुतूहलानेच मला इतिहासाच्या पानांमध्ये लपलेलं 'कोरलई क्रिओल' नावाचं एक जीर्ण पिंपळपान दाखवलं होतं. पाचशे वर्षांपूर्वी कधीतरी त्याचं बीज वाऱ्यावरून लहरत आलं, रुजलं आणि इतकी वर्षं एक रोपटं म्हणून का होईना नेटाने तग धरून राहिलंसुद्धा. त्याचं पुढे काय होईल याबद्दल मी काही भाष्य करू शकत नाही. परंतु सध्यातरी एका अगदी छोट्या भूभागाची ओळख बनून राहिलेली ही भाषा आपल्या देशाच्या इंद्रधनुष्यासारख्या संस्कृतीमध्ये आपलीही एक छटा घेऊन उभी आहे एवढं मात्र खरं!

■

प्रतिसाद

**सट्टा मटका बाजाराच्या भाषेतील संज्ञा – 'बलन'**

**हि**वाळा २०१८ अंकात प्रसिद्ध झालेल्या प्रा० निधी पटवर्धन ह्यांच्या लेखाद्वारे वाचकांना सट्टा मटका बाजाराच्या बाजारातील विविध पारिभाषिक संज्ञांचा परिचय झाला आहे. मात्र, एक महत्त्वाची संज्ञा ह्यातून सुटली असे वाटते. ती संज्ञा म्हणजे 'बलन'. बलन ह्याचा अर्थ सट्टा किंवा वरली/मटका लागल्यानंतर मिळणारी बक्षिसाची रक्कम. ह्या रकमेसाठी विदर्भात बलन हा शब्द वापरला जातो. इतर ठिकाणी दुसरा काही शब्द असल्यास ठाऊक नाही.

पृथ्वीराज ठाकूर
चांदमारी, चर्चजवळ, खामगाव 444 303

■

## अहिराणीच्या निमित्ताने समग्र भाषांची संहिता

**सयाजी पगार**

*[परीक्षित पुस्तक : अहिराणीच्या निमित्ताने : भाषा. लेखक : डॉ० सुधीर रा० देवरे, पद्मगंधा प्रकाशन, पुणे. पृष्ठे १५१, किंमत रु० १६०.]*

**ए**खाद्या बोलीच्या निमित्ताने सर्वच भाषांना लागू होणारी संहिता कशी तयार होते, ते दर्शवणारं उत्तम उदाहरण म्हणजे 'अहिराणीच्या निमित्ताने: भाषा' हे पुस्तक. लोकसाहित्याभ्यासाची असली तरी त्यातही स्वतःची अशी वेगळी वाट निवडणारे व त्यासाठी रात्रंदिवस चिंतन-मननासह अभ्यास करणारे, अहिराणी भाषेचे निष्ठावंत पाईक डॉ० सुधीर रा० देवरे हे भाषा, कला, लोकवाङ्मय व लोकजीवनाचे संशोधक आहेत. हे पुस्तक उत्कृष्ट संदर्भ ग्रंथ असून त्याला २०१६ साली महाराष्ट्र शासनाचा 'नरहर कुरुंदकर भाषा पुरस्कार' प्राप्त झाला आहे.

पुस्तकाच्या शीर्षकामुळे पुस्तक अहिराणी बोलीत असेल की काय असा कोणाचा समज होऊ शकतो. पण या पुस्तकातील सर्व लेख मराठी भाषेत आहेत. एकूण अठरा लेखांमधून महाराष्ट्रातील किंबहुना भारतातील सर्वच बोलीभाषांवर प्रकाशझोत टाकण्यात आला आहे. लोकसाहित्याच्या स्वरूपाची, विविध भाषांच्या समान संदर्भांची, लोकसंस्कृतीतील सांस्कृतिक परंपरांच्या पटाची लोकतत्त्वीय अध्ययन दृष्टीतून मांडणी करण्यात आली असून भाषांच्या उपयोजनासाठी लोकजीवन, लोकश्रद्धा, लोकपरंपरा, लोकधाटी व लोकसंस्कृतीचेही येथे यथार्थ दर्शन घडतं. त्यामुळे प्रस्तुत ग्रंथ भारतातील सर्वच बोलीभाषा, प्रमाणभाषा, लोकसाहित्य, आदिवासी साहित्य, लोकसंस्कृती, लोकजीवन आदी क्षेत्रांतील भाषाभ्यासकांना व संशोधकांना नवनवीन वाटा शोधण्याचा उत्तम संदर्भस्रोत उपलब्ध झाला आहे.

पहिल्याच प्रकरणात अहिराणी व मराठी शब्दांच्या काही करामतींचा उलगडा केला गेला आहे. भारतात असंख्य बोली बोलल्या जातात, पैकी आज बऱ्याच भाषा मृत झाल्या आहेत. सध्या अठराशे बोलींचा नामोल्लेख सापडत असला तरी पंधराशेच्या आसपास भाषा भारतात शिल्लक राहिल्या आहेत. भाषा जिवंत व प्रवाही राहण्यासाठी, त्या भाषांचं संवर्धन होण्यासाठी जाणीवपूर्वक प्रयत्न करण्याची गरज लेखकानं पटवून दिली आहे.

भाषा समजण्याची अडचण असली तर शालेय जीवनात विद्यार्थ्यांना भाषिक विनोदही कळत नाही याचं मजेशीर अनुभवातून चिंतन 'चाळ आणि मुळाक्षरे' या प्रकरणात आलेलं आहे. पु०ल० देशपांडे यांचा 'बटाट्याची चाळ' हा धडा शालेय वर्गात शिकत असतानाचा

लेखकाचा अनुभव इथं उपयोजित केला आहे. ग्रामीण व शहरी भागातील भिन्न संकल्पना, वस्तू, वास्तू, पदार्थ, फळं, घरं इत्यांदींचा मुळाक्षरं शिकवत असताना परस्पर संबंधांचं प्रास्ताविक शिक्षकाने न केल्याने मुळाक्षरांचं गैरसमजांचं महाभारत निर्माण होतं ते ग्रामीण विद्यार्थ्याला पुढे आयुष्यभर भाषिकदृष्ट्या नडत राहतं. म्हणून त्या त्या भाषेतल्या रोजच्या परिचित वस्तूंची माहिती शिक्षकाने विद्यार्थ्यांना करून देणं योग्य ठरतं. सर्वत्र समजतील अशा वस्तूंची नावं शालेय अभ्यासक्रमात समाविष्ट करणंही आवश्यक आहे, असं लेखक सुचवतो.

मातृभाषा लपवणं चुकीचं आहे, भाषेत शुद्ध-अशुद्ध असं काही नसतं, बोलीतल्या अश्लील शब्दांकडे अश्लील दृष्टिकोणातून न पाहता सामान्य ग्रामीण संज्ञा म्हणून पाहावं आदी बाबी पुस्तकात अधोरेखित होत राहतात. श्री० विश्वनाथ खैरे ह्यांचा भाषेकडे पाहण्याचा दृष्टिकोण डॉ० देवरे ह्यांना भावतो म्हणून खैरे ह्यांच्या काही पुस्तकांवर विस्तृत भाष्य केलं गेलं आहे. खैरे ह्यांच्या समग्र ग्रंथांसह त्यांच्या त्रोटक वाटणाऱ्या पुस्तिकाही संशोधनात्मक ग्रांथिक बळ कसं देतात हे एका लेखात सोदाहरण दाखवून दिलं गेलं आहे.

'पारख आणि पारखं : एका अनुस्वाराचा फरक' ह्या लेखात विश्लेषणात्मक निरीक्षणातून लेखकाने जे मांडलं ते म्हणजे दोन भाषांच्या लेखनातही शब्दसाम्य पण अर्थविरोध दिसून येतो. पारख आणि पारखं या संज्ञांच्या अर्थांचं गुपित या लेखात स्पष्ट केलं आहे. एका अनुस्वारामुळे शब्दाचा अनर्थ कसा होतो हे ह्या लेखातून मुळातून वाचायला हवं.

प्रांतवाद वा भाषावादाच्या भानगडीत न पडता मराठी माणसाने विशाल दृष्टिकोण स्वीकारत मराठी भाषा अस्मितेनंतर भारतीय अस्मिता आणि शेवटी वैश्विक भाषा मानवतेला प्राधान्य द्यायला हवं असं लेखक म्हणतात, ते महत्त्वाचं आहे. भाषा आणि राजकारण ह्यांच्यातल्या संबंधावर साधकबाधक चर्चा एका प्रकरणात आली आहे. मराठी भाषेची मानसिकता कशी टिकवायची हा प्रश्नही ह्या निमित्ताने ऐरणीवर आणला गेला.

'अहिराणी भाषा: उत्पत्ती आणि इतिहास' या दीर्घ आणि पुस्तकातील सर्वात महत्त्वाच्या लेखात अहिराणी भाषेचे कूळ आणि मूळ शोधले आहे. एखाद्या अभ्यासकाला अहिराणी भाषा वस्तुनिष्ठपणे अभ्यासायची असेल तर त्याने फक्त हा लेख वाचला तरी अहिराणीबद्दल त्याला सर्व काही ज्ञात होईल, असा हा ४६ पानांचा प्रदीर्घ लेख आहे. प्रस्तुत लेख विस्तृत व सूक्ष्म नोंदींसह मांडून खानदेशच्या सर्व अंगोपांगांवर अभ्यासपूर्ण प्रकाशझोत टाकला आहे. उदा० अभिर- अहिर, खानदेश शब्दाची निर्मिती, खानदेशची उत्पत्ती, विस्तार, क्षेत्रफळ, खानदेशातील बागलाण प्रांत, बागूल राजांची राजवट, अहिराणीची उत्पत्ती, अहिराणी व्याकरण, साहित्य, अहिराणीतील मौखिक लोकसाहित्य,

शिलालेख, अहिराणीचे संशोधन करणारे अभ्यासक, अहिराणीचे व्याकरण, लिखित वाङ्मय, आधुनिक साहित्य, अहिराणीतील शब्दसौष्ठव इत्यादी. भारतात आज अस्तित्वात असलेल्या पंधराशे बोलींपैकीच अहिराणी एक आहे. ती सोयीसाठी मराठीची बोली म्हणून ओळखली जाते. ह्या लेखाच्या समारोपातील संश्लेषण अतिशय महत्त्वपूर्ण योगदान ठरावे.

भाषा ही कोणतीही असो ती संवादासाठी अस्तित्वात आलेली असते. भाषा ही संबंध जोडण्यासाठी आहे, तोडण्यासाठी नाही. म्हणून स्वभाषेचा आग्रह धरणं जसे नैसर्गिक आहे, तसं परभाषेचा दुस्वास करणं असंमजपणाचं लक्षण आहे. भाषा दुर्बोध करण्यापेक्षा ती प्रवाही असावी, संवादी असावी, व्यवहारी, कालिक, कलासंपन्न, ज्ञानसंपन्न, गतिमान आणि सौष्ठवयुक्तही असावी. तरीही भाषा नैसर्गिकपणे चिरंजीव ठरवायची असेल तर कोणत्याही दुराग्रही अट्टहासापासून मुक्त असायला हवी. परभाषेच्या आदरावरच स्वभाषेची वाढ होऊ शकते, असं आग्रही प्रतिपादन डॉ० देवरे करतात.

'अहिराणी बोलीचे शब्दविशेष' ह्या प्रदीर्घ लेखात अहिराणीचा भूगोल आणि इतिहासावर प्रकाशझोत टाकला आहे.

शिवीसदृश शब्द बोलीभाषेत आला तर नागरी लोकांचा कसा गैरसमज होतो वा भाषेकडे पाहण्याचा दृष्टिकोण कसा वाईट होतो ह्याचं यथार्थ विश्लेषण 'भाड्या आणि भाड्या' या लेखात आले आहे. भाड्या, रांडना, यानीमायले, तुनीमायले, आत्तेनीमायले इत्यादी शब्द ऐकल्यावर शहरी माणसाचा गैरसमज होतो. पण अहिराणीत वा इतर बोलीत नकळत सामान्य नामाप्रमाणे हे शब्द वापरले जातात. अशा शब्दांत अश्लीलता नसते. ग्रामीण मनातही अश्लीलता नसते. तो केवळ लोकपरंपरेचा आविष्कार समजला पाहिजे. ग्रामीणांना शब्दांच्या अर्थाशी विशेष देणंघेणं नसतं. बोलण्याची ती लकब झालेली असते.

भारतातील सर्वच बोली आणि प्रमाणभाषेवर पुस्तकात भाष्य आलं आहे. म्हणून ग्रंथाच्या शीर्षकात अहिराणीचा उल्लेख आला असला तरी तो केवळ अहिराणीच्या निमित्ताने केलेल्या चिंतनापुरता आहे. बाकी सर्व विवेचन जगातील समग्र भाषेबद्दल आहे. जगातील अनेक बोली या आदिम भाषा आहेत, हे नक्की. म्हणून आपापल्या बोलीसोबतच परभाषांचाही आदर करा असं आवाहन डॉ० देवरे करतात.

'भाष्यकाराते वाट पुसतु' ह्या न्यायाने पुस्तकातील भाषांचा बंध-अनुबंध जोडताना ग्रिअर्सन, वि०का० राजवाडे, लक्ष्मणशास्त्री जोशी, महादेवशास्त्री जोशी, पां०मा० चांदोरकर, श्री०व्यं० केतकर, ना०गो० कालेलकर, भा०रं० कुलकर्णी, द०ग० गोडसे, डॉ० अशोक रा० केळकर, दा०गो० बोरसे, विश्वनाथ खैरे, डॉ० गणेश देवी ह्यांच्या विचारांचाही परामर्श पुस्तकात येत राहतो.

■





अनुक्रमणिका

## मराठी परिभाषेवर जोरदार चर्चा

**प्रदीप पिंगळे**

**म**राठी पारिभाषिक शब्दांसाठी साधे-सोपे मराठी प्रतिशब्द निर्माण करून ते प्रचलित करायला हवे, तरच मराठी ही ज्ञानभाषा होऊ शकेल, असे प्रतिपादन व्याकरण अभ्यासक अरुण फडके यांनी केले. रविवार, दि० ४ मार्च २०१८ रोजी फर्ग्युसन महाविद्यालय, पुणे येथे मराठी अभ्यास परिषदेतर्फे आयोजित, ज्येष्ठ व्याकरणतज्ज्ञ सत्त्वशीला सामंत स्मृती व्याख्यानामध्ये ते बोलत होते. 'मराठी परिभाषा - कशी नसावी, कशी असावी' हा त्यांच्या व्याख्यानाचा विषय होता. विविध ज्ञानशाखांमधले ज्ञान मराठीत आणताना, नवनवीन शब्दनिर्मिती करणे आवश्यक आहे, त्यामुळे परिभाषा कोशांची अत्यंत निकड असते. मराठीमध्ये पारिभाषिक शब्दांची संख्या अत्यंत कमी असून त्यांपैकी अनेक शब्द समजायला बोजड आहेत. त्यांचा अर्थ समजत नाही व त्यामुळेच ते फारसे वापरलेही जात नाहीत. त्यासाठी आपण स्वतः परिभाषा कोश तयार करत असून त्यात इंग्रजी शब्दाला मराठी पारिभाषिक शब्द शोधताना सर्वप्रथम 'संपूर्ण मराठी शब्द', त्यानंतर 'मराठी व संस्कृत जोडशब्द' आणि शेवटी 'संपूर्ण संस्कृत पण सोपा शब्द' अशा तीन प्राधान्यक्रमांचा आधार घेतला आहे, असेही त्यांनी स्पष्ट केले.

परिभाषेच्या प्रक्रियेमध्ये अर्थाची व्याप्ती वाढवणे महत्त्वाचे असते, असे सांगून त्यांनी अनेक मराठी पारिभाषिक शब्दांची व त्यांना पर्यायी ठरू शकणाऱ्या सोप्या व अचूक शब्दांची उदाहरणे दिली. सध्याच्या परिभाषा कोशांमध्ये संस्कृतच्या प्रभावाने सर्वसामान्यांच्या दृष्टीने अनेक अनाकलनीय शब्द दिसतात. त्या शब्दांना पर्यायी सोपे मराठी शब्द किंवा मराठीच्या बोलींमधले शब्द वापरावे, असेही त्यांनी सुचवले.

इंग्रजीने पारिभाषिक शब्द तयार करताना लघुरूपांचा वापर, धातूंपासून नामे किंवा नामांपासून धातू बनवणे अशा अनेक पद्धती वापरल्या आहेत. मराठी भाषा भाषासिद्धीच्या दृष्टीने अतिशय समृद्ध भाषा आहे. नवीन शब्द घडवण्याची तिच्यात प्रचंड क्षमता आहे. 'टपाल'पासून 'टपालणे' सारख्या नवीन क्रियासूचक शब्दांचा वापर मराठीने केल्यास परिभाषा अधिक सोपी व व्यापक होऊ शकेल, त्यासाठी उदार दृष्टिकोण ठेवावा, असे आवाहनही त्यांनी केले. या व्याख्यानानंतर भरपूर प्रश्नोत्तरे झाली मात्र वेळेअभावी ती थांबवावी लागली. मराठी अभ्यास परिषदेचे अध्यक्ष प्रा० प्र०ना० परांजपे या व्याख्यानाच्या अध्यक्षस्थानी होते. प्रास्ताविक आणि सूत्रसंचालन विजय पाध्ये यांनी केले तर आभारप्रदर्शन संस्थेचे कार्यवाह डॉ० आनन्द काटीकर यांनी केले.

■

## लेखक-परिचय

**काटीकर, आनन्द** : एम०ए० (मराठी), पीएच०डी०, फर्ग्युसन महाविद्यालय, पुणे येथे मराठी विषयाचे सहयोगी प्राध्यापक. ऑगस्ट २०१५पासून राज्य मराठी विकास संस्थेचे प्रभारी संचालक म्हणून कार्यरत.

टपाल-पत्ता : B-5/16 सनसिटी, सिंहगड रस्ता, आनंदनगर, पुणे 411 051.

चलभाष : 94216 10704 ई-पत्ता : anand.katikar.marathi@gmail.com

**नेवे, शिल्पा** : एम०ए० (मराठी), रुईया महाविद्यालय, मुंबई येथे मराठी विषयाच्या साहाय्यक प्राध्यापक.

टपाल-पत्ता : C-22 संकल्प, बाजीप्रभू देशपांडे मार्ग, कॉर्पोरेशन बँकेजवळ, आनंदनगर, दहिसर (पूर्व), मुंबई 400 068

चलभाष : 92222 07488 ई-पत्ता : shilpaneve@gmail.com

**पगार, सयाजी** : एम०ए० (मराठी), अहिराणी भागातील लोकदैवते ह्या विषयावर पीएच०डी०, झोडगे (ता० मालेगाव) येथील संदीप कला महाविद्यालयाचे प्राचार्य. आता सेवानिवृत्त.

टपाल पत्ता : 'ममता', ज्ञानेश्वर नगर, गवती बंगल्याजवळ, मालेगाव कँप, नाशिक

चलभाष : 75880 95872, 77095 31002

**पिंगळे, प्रदीप** : एम०ए० (मराठी), एम०ए० भाषाविज्ञानाच्या दुसऱ्या वर्षाचे शिक्षण चालू.

चलभाष : 96897 16384 ई-पत्ता : pradeep.pingale03@gmail.com

**फडके, अरुण** : मूलतः मुद्रणव्यवसायी. मराठी भाषा आणि व्याकरणाचा विशेष अभ्यास, मराठी शुद्धलेखन व व्याकरण, संपादनकला इत्यादी विषयांचे मार्गदर्शक. स्वतंत्र पुस्तकांचे व कोशांचे लेखक.

टपाल-पत्ता : 602 चित्रकूट सहनिवास, डॉ० आंबेडकर मार्ग, ठाणे (पश्चिम) 400 601

चलभाष : 98678 72930 ई-पत्ता : aphadake@#yahoo.com

**फाटक, प्रसाद** : सॉफ्टवेअर अभियंता म्हणून व्यवसाय. 'इत्यादी' ह्या अनुदिनीचे लेखक. MahaMTB.com ह्या पोर्टलसाठी पुस्तकांविषयीचे सदरलेखक.

टपाल-पत्ता : 83/25 प्राधिकरण, निगडी, पुणे 411 044

चलभाष : 96899 42684 ई-पत्ता : prasadgates@gmail.com




मराठी भाषा विभाग




# राज्य मराठी विकास संस्था






## भारतातील पहिलं पुस्तकांचं गाव

- स्ट्रॉबेरीसोबत पुस्तकांचा आनंद घ्या !
- पुस्तके वाचायला या / राहायला या (निवास व्यवस्था - सशुल्क असेल)
- ३० घरे, २८ साहित्य प्रकार, २५,०००हून अधिक दर्जेदार पुस्तके...



मु. पो. भिलार, ता. महाबळेश्वर,
जि. सातारा ४१२८ ५
संपर्क : २१६८-२५ १११
pustakanchgaav.rmvs@gmail.com

## राज्य मराठी विकास संस्थेचे सुरू असलेले प्रकल्प

- मायमराठी (अमराठी भाषकांना मराठीचे प्रशिक्षण)
- मराठी बोलींचे प्रतिमांकन
- बृहन्महाराष्ट्रातील संस्थाना अनुदान
- मराठी संशोधन संस्थांना अनुदान
- दुर्मिळ पुस्तके व नियतकालिके संवर्धन
- संगणकीय आज्ञावल्यांचे मराठीकरण
- भाषाविज्ञान शिष्यवृत्ती योजना
- गीतार्णव शब्दार्थ संदर्भ कोश
- विधिशास्त्र संज्ञा संकल्पना कोश
- ऑलिम्पिक माहितीकोश
- रंगवैखरी- आंतरमहाविद्यालयीन नाट्याविष्कार स्पर्धा
- फिरते वाचनालय
- भाषिक कौशल्यांच्या विविध स्पर्धा

## खेळ खेळा कल्पक गमतीदार






## प्रत्येक शालेय विद्यार्थ्याकडे असलीच पाहिजेत अशी पुस्तके




मराठी लेखन मार्गदर्शिका
मूळ किंमत ₹१२५/-
सवलतीत ₹१००/-



शालेय मराठी शब्दकोश
मूळ किंमत ₹२००/-
सवलतीत ₹१५०/-



विज्ञान संकल्पना कोश
मूळ किंमत ₹२५०/-
सवलतीत ₹२०० /-

राज्य मराठी विकास संस्था
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग, धोबीतलाव, मुंबई - ४०० ००१
दूरभाष : (०२२) २२६३ १३२५, २२६५ ३९६६
संकेतस्थळ : www.rmvs.in / www.rmvs.marathi.gov.in इ-टपाल: rmvsmumbai@gmail.com

